


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






## आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६० वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ क़र्त्यांनी जे उद्देश डोळयांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदान-प्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित-वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता' पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयातील ग्रंथालयात अद्ययावत् पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयातून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांना आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रू. ४००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

– संपादक मंडळ

## लेखकांस आवाहन

*नवभारत मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण नवभारताकडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी अशी विनंती आहे.*

*१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.*

*२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यासह द्यावेत.*

*३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही याची स्पष्ट कल्पना नवभारतच्या संपादकांना द्यावी.*

*४. नवभारतमध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात नवभारतमध्ये येईल किंवा येणार नाही हे यथावकाश कळविले जाईल याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.*

*आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.*

*- संपादक मंडळ*

**सर्व वर्गणीदारांनी कृपया आपला दुरध्वनी क्रमांक, भ्रमणध्वनी क्रमांक व इमेल आयडी (असल्यास) व पत्ता त्वरीत टपालाने कळवावे. फोनवरून कळवू नये. कळावे ही विनंती**

**- व्यवस्थापक**

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६८। अंक १२। सप्टेंबर २०१५
श्रावण / भाद्रपद शके १९३७
वार्षिक वर्गणी ४०० रुपये
या अंकाची किंमत रु. ३०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



**संपादकीय पत्रव्यवहार :**
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
नीता गायकवाड
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.









अनुक्रमणिका

# नवभारत

## सप्टेंबर २०१५

## अनुक्रमणिका

# शिवशाहिरांना मानाचा मुजरा

श्री. मा. भावे

एकोणीसशे सत्तेचाळीस साली, स्वातंत्र्य मिळण्याच्याही आधी, बाबासाहेब पुरंदरे यांचा 'जाळत्या ठिणग्या' हा अवघा ९६ पानांचा शिवकालीन वीरकथांचा संग्रह प्रसिद्ध झाला. सन १६४८ मध्ये शिवाजीराजांवर विजापूरच्या दरबाराने फत्तेखान नावाचा सरदार पाठवला होता. तिथून सुरुवात करून सन १७०५ मध्ये वाकितखेड्याच्या बेरडांनी औरंगजेबाच्या अफाट सैन्याविरुद्ध निधड्या छातीने व कावेबाजपणाने किल्ला लढविला तिथपर्यंतच्या सत्तावन्न वर्षांतील रोमहर्षक प्रसंग बाबासाहेबांनी आपल्या रंजक आणि प्रेरक भाषेतून रंगवले होते.

पासष्ट वर्षांपूर्वी, मी प्राथमिक शाळेत असताना, ते पुस्तक वाचले तेव्हा त्या अनुभवाने मी भारावून गेलो होतो, हे मला अजूनही आठवते. त्या काळात सकस बालवाङ्मय तयार होत नव्हते असे नाही. 'गोट्या' (तीन भाग), 'चंदू', 'किशोर' अशा शाळकरी मुलांच्या कथा ना. धो. ताम्हणकर, खानोलकर इ. लेखक लिहीत होते व ती पुस्तके लोकप्रियही होती. यांखेरीज इंग्रजी कथा कादंबऱ्यांचे अनुवाद प्रसिद्ध होत होते. उद्‌बोधकता व रंजकता हे या पुस्तकांचेही महत्त्वाचे गुण होते. पण 'जाळत्या ठिणग्यांची' जी जादू होती तिच्यापुढे ही पुस्तके अगदीच सपक व निर्जीव वाटत होती. 'जाळत्या ठिणग्या' तुम्हाला उडत्या गालिच्यावर बसवून थेट शिवकाळातच घेऊन जात होते. खेड्यापाड्यांतून पसरलेली व परकी राजवटीखाली दडपलेली मावळातील माणसे दगडाखालून गवताने वर डोके काढावे त्याप्रमाणे बादशाही अंमलदारांच्या डोळ्याला डोळा भिडवू लागली होती. त्यांना आधार होता शिवाजी भोसले व त्यांची आई जिजाऊ यांचा. पंधरावीस वर्षांपूर्वीपर्यंत रावण/कुंभकर्णागत खवीस वाटणारे विजापुरी सरदार आणि सुभेदार आता थट्टाविनोदाचे विषय झाले होते. अफझलखानासारख्या हैवानाला राजांनी लोळवले आणि मराठी सैन्याने खानाच्या फौजेचे रानटी कुत्र्यांनी रानरेड्यांचे तोडावेत तसे लचके तोडले! औरंगजेबाच्या काळमिठीतून शिवाजीराजे अलगद सुटून, राजगडावर पोचले आणि मातोश्रीच्या पायांवर त्यांनी डोके ठेवले. शाळेच्या इतिहासातून आम्ही या हकिकती शिकलो होतोच; पण बाबासाहेबांच्या लेखणीच्या इंद्रजालाने ती माणसे, ते प्रसंग, त्या हातघाईच्या लढाया आपल्या भोवती घडत आहेत, असा भास निर्माण केला होता.

लढाया, हल्ले, किल्ल्यांना पडलेले वेढे, मोगली व विजापुरी सरदारांच्या स्वाऱ्या, शिवाजीराजांचे डाव आणि हिकमती या अनेकदा होणाऱ्या घडामोडी होत्या. पण त्याच्याही पलीकडे मावळातील समाजाचा नित्यक्रम होताच. पाटला-देशमुखांच्या वाड्यातून त्यांची मुले-लेकरे नांदत होती, शिवारातून शेते पिकत होती, वसूल गोळा करावा लागत होता. या दैनंदिन जीवनाचे वर्णनही बाबासाहेब मोठ्या गोजिरवाण्या पद्धतीने करीत होते. 'अशीच एका दिवशीची गोष्ट. दुपारची वेळ. सूर्य नुकताच कोठे माथ्यावरून कलला होता. साऱ्या गावात शांतता होती. कान्होजींच्या वाड्यावरील देव डीवाले हशम भाकरतुकडा खाऊन नुकते कोठे देवडीवर टेकले होते. वाड्यातही शुकशुकाट होता. पलीकडच्या ओटीवर चारदोन कुणबिणी सडणकांडण करीत होत्या त्याचाच काय तो आवाज येत होता. खाशी माणसे बहुतेक वामकुक्षीच्या निमित्ताने लवंडली होती. ....येवढ्यात दौडत दौडत एक पठाण जासूद दरवाजापाशी थडकला. त्याने घोड्यावरून खाली उडी टाकली व तो आत जाऊ लागला.' ('जाळत्या ठिणग्या', पान १२). वर्णनाचा ओघ व रोख असा आहे की, नाट्यपूर्ण घटना या आगंतुक आहेत आणि रोजच्या राहाटीवर झालेला तो एक आघात आहे.

प्रतापराव गुजर हे राजांचे सेनापती. विजापुरी सरदार बहलोलखान स्वराज्यावर चालून आला. प्रतापरावांनी आपल्या डावपेची हालचालींनी त्याला शरण आणले;






अनुक्रमणिका

पण दिलदारपणे सोडून दिले. राजांना प्रतापरावाचे औदार्य अजिबात नापसंत होते. त्यांनी प्रतापरावांची कानउघाडणी करणारे पत्र पाठवले. पत्र प्रतापरावांना मिळाले तोच बहलोलखान नेसरीच्या खिंडीतून चालून आला. तेव्हा केवळ सहा लढवय्ये घेऊन प्रतापराव बहलोलच्या सैन्यावर 'कडा कोसळावा, तसे कोसळले.... हा दिवस महाशिवरात्रीचा होता. प्रतापरावाची प्रखरता तृतीय नेत्र उघडणाऱ्या मृत्युंजयासारखी तीव्र झाली होती. ह्या खवळलेल्या रुद्राच्या तांडवात किती असूर मारले जात होते हे प्रत्यक्ष मृत्यूला तरी माहीत होते की नाही, कोण जाणे! खान तर चकितच झाला. येवढ्या प्रचंड फौजेवर सातांनी मात करावी?.... प्रतापरावांची समशेर शेवटच्या क्षणापर्यंत फिरत होती. परंतु एका भयंकर प्रकाराने तोही जमिनीवर पडला. प्रतापराव ठार झाला! मराठी दौलतीतले सात हिरे हरपले! महाराजांचा दुसरा तान्हाजी गेला!! मरणाचे भय कोणाला?... मराठ्यांना?... तुळशीदासाने म्हटलेल्या पोवाड्यातील ओळ प्रतापराव विसरलेला नव्हता' "मराठ्यांची पोरे आम्ही नाही भिणार मरणाला!" ('जाळत्या ठिणग्या', पान ६५-६६).

छत्रपतींच्या शिलेदाराचे वर्णन तर इतके वेधक होते की, डोळे मिटताच तो चिमखडा शिलेदार नजरेसमोर येई. 'त्यातच एक ताठर मानेचा बेदरकार शिलेदार आपली भाल्यासारखी तीक्ष्ण नजर मोठ्या तोऱ्यात अवतीभवती मधूनमधून फिरवीत घोडा दौडीत होता. वय पाहावे तर नुकतीच कोठे विशी ओलांडलेली, शिडशिडीत पण पेरूच्या खोडासारखे कणखर शरीर, आणि घोड्यावर बसण्याची ऐट काही न्यारीच! त्याच्या छातीवर रुळणारा निळसर शेला तर विशेष खुलून दिसत होता त्याला. त्याचा घोडासुद्धा मोठा उमदा होता... तिरपी तिरपी मान करीत टापा टाकणारे ते जनावर मोठे तेजस्वी आणि कमालीचे चपळ दिसत होते.', ('जाळत्या ठिणग्या', ७१).

पण 'जाळत्या ठिणग्या', 'दख्खनची दौलत', 'पुरंदरच्या बुरुजावसन' यांसारखी पुस्तके ही सरावासाठी केलेली तलवारबाजी होती. एकतर ही पुस्तके शाळकरी मुलांसाठी लिहिलेली होती. त्यामुळे बाबासाहेबांनी 'राजा शिवछत्रपती'च्या रूपाने आपले इतिहासाचे ज्ञान आणि घोटीव मराठ्यांची शैली यांची जी आतषबाजी केली, तिच्या पुढे 'जाळत्या ठिणग्या' या दिवाळीतल्या टिकल्यांप्रमाणे भासतात. या 'ठिणग्या एकत्र येऊन मशाल पाजळली जायला आणि भवताल उजळून निघायला' थोडा अवकाश होता.'

(१)

एकोणीसशे पन्नासपासून पुढे बारा वर्षांचा काळ बाबासाहेबांनी तपश्चर्या करण्यात घालवला, असे म्हणता येईल. एका दृष्टीने पाहिले तर जन्मापासून बाबासाहेब या तपश्चर्येसाठी स्वतःला तयार करीत होते. पुरंदरच्या पायथ्याशी असणाऱ्या सासवडात पुरंदऱ्यांचा सरकारवाडा आहे. दिव्याचा घाट, बोपदेवचा घाट, कात्रजचा घाट तसेच निळवंडी, गुंजवणी, कऱ्हा या नद्यांची खोरी हा सारा सरकारवाड्याच्या पंचक्रोशीतलाच प्रदेश म्हणावयाचा. रायरेश्वर, रोहिडा, राजगड, तोरणा, पुरंदर आणि एके काळी विजापुरी सल्तनतीच्या अभिमानाचे ठाणे असलेला शिरवळचा किल्ले सुभानमंगल ही इतिहासप्रसिद्ध ठिकाणे आसपासच होती. सरदार पुरंदऱ्यांच्या सरकारवाड्यावर या रहाळातील माणसांचा राबता असायचा. त्यामुळे या लोकांची राहणी, त्यांचे कुलाचार, नाती-गोती, त्यांचे स्वार्थ आणि परमार्थ, पोषाख, विचार करण्याची पठडी, त्यांची दैवते व त्यांच्या यात्रा, त्यांच्यावर येणारी आधिदैविक व आधिभौतिक संकटे यांची बाबासाहेबांना तपशिलवार माहिती झाली होती.

पुरंदऱ्यांचे घराणे इतिहासप्रसिद्ध. छत्रपतींच्या काळात महादजी व निळोपंत पुरंदऱ्यांनी स्वराज्याच्या उभारणीला हातभार लावला होता. फत्तेखानाच्या स्वारीच्या वेळी कान्होजी जेध्यांसोबत महादजीपंत पुरंदरेही छत्रपतींना सल्ला देणाऱ्यांत होते. पुढे पेशव्यांच्या काळात पुरंदऱ्यांच्या दोन-तीन पिढ्यांनी पेशव्यांचे कारभारी म्हणून काम पाहिले. पुरंदऱ्यांचे खानदान तालेवार आणि त्यांचा सरकारवाडाही टोलेजंग. बाबासाहेबांनीच त्याचे वर्णन केले आहे-'सरकारवाडा म्हणजे एक छोटासा भुईकोट किल्लाच होता. कोटाचा ऐन मध्य साधून सरकारवाडा उभा होता. आज तो अडीचशे वर्षे असाच उभा होता. साग्रसंगीत चिरेबंदी घडणीच्या आमच्या सरकारवाड्याला एकूण दालने होती सत्तेचाळीस. ओसऱ्या, ओट्या, माजघरे,

धान्याच्या कोठ्या, जामदारखाना, देवघर, मुदपाकखाना खजिना, दफ्तरखाना, फरासखाना, रंगमहाल, भवानीमहाल, शिणगारमहाल, दिवाण कचेरी, बाळंतिणीची खोली, जिन्नस कोठी, खाजगीच्या कोठ्या, एक की दोन? अशी सारी दालने होती. वाड्याची तुळवटं, कडीपाट, खांब आणि कमानी अशा भक्कम होत्या की, निदान आमच्या आजोबांपासून माझ्यापर्यंत वाड्यात कधी दुरुस्ती करायची वेळ आल्याच कोणाला स्मरत नाही.' (पुरंदऱ्यांचा सरकारवाडा, पान ११०). या वाड्यात राहिलेली व वावरलेली माणसेही तशीच तोलामोलाची आणि मोठ्या काळजाची. ही माणसंही बाबासाहेबांनी अगदी जवळून पारखली. महार, लोहार, रामोशी, गुरव, मराठे, धनगर, कुणबी अशी नाना जातींची माणसे. त्यांचे धंदे वेगळे, समजुती वेगळ्या, वागण्याच्या तऱ्हा निरनिराळ्या. मुख्य गोष्ट ही की, ही सगळी लोकरहाटी बाबासाहेब पाहत होते विसाव्या शतकात; पण त्यांचे मन मात्र शिवकाळात रेंगाळत त्याचे आकलन करून घेत होते.

बाबासाहेब सरकारवाड्यात राहिले व मोठे झाले. पण तितक्यातच गुंतून पडले नाहीत. भवतालच्या प्रदेशातले किल्ले, नद्यांची पात्रे, वाडेहुडे, देवस्थाने, मशिदी, दर्गे, समाध्या व यात्रास्थाने या सर्व ठिकाणी ते आपल्या सवंगड्यांसह वारेमाप भटकले. शेतकऱ्यांच्या झोपड्यांतून त्यांनी रात्री वसती केली. शेणाने सारवलेल्या खळ्यांवर घोंगड्या टाकून ते झोपले. त्या गावंढ्या जीवनात ते पुरे मिसळून गेले. या अनुभवातून त्यांची भाषा घडत गेली. तिच्यात एका सुघट शैलीचा आढळ होऊ लागला. कृत्रिमपणा उडून गेला आणि अनुभवाचा निखळ प्रत्यय येऊ लागला. 'दरडीवरती दरड, कड्यावरती कडे, त्याच्या वरती कपार, कपारीला धार, धारेवरती कोट, कोटाच्या आत माची, माचीच्या आत बालेकिल्ला, बालेकिल्ल्याला चोवीस बुरुज, चोवीस बुरुजांत शेंदऱ्या बुरुज टेकला होता आभाळाला. आभाळात भिरभिरत होत्या घारी अन् बालेकिल्ल्यावर तळपत होत्या तिखट तलवारी', या सारखी तालबद्ध आणि लफ्फेदार वाक्ये तो डोंगर, त्याची ठेवण, त्याचा परिसर ही सर्व जाणिवेत भिनल्याखेरीज लेखणीतून उमटत नाहीत. गुंजणमावळातील बायकांच्या तोंडी असणारी ओवी 'पुनं झालं जुनं। गाऊ गोड त्या भराऱ्याला।। सोनियाची ग पायरी। राजगड, तोरन्याला।।' अशी टीप धरून येते की 'वा! खूब।।' अशी शाबासकी सहजच तोंडातून उमटावी.

(२)

शिवचरित्राचा ध्यास घेऊन अभ्यास करण्याचे ठरल्यावर बाबासाहेब वाट न चुकता भारत इतिहास संशोधन मंडळात दाखल झाले. मंडळाचा जन्मच मुळी महाराष्ट्राचा गौरवशाली इतिहास लोकांपुढे मांडून त्यांच्यात राष्ट्रबुद्धी चेतविण्यासाठी झाला होता. शिवकालीन कागदपत्रांचा शोध घेण्याचा वसाच मंडळातील संशोधकांनी घेतला होता. कुठल्या कुठल्या आडमार्गावर असलेल्या घराण्यांना हुडकून काढून मठ आणि देवस्थानांतील मुख्यांची आर्जवे करून, रद्दीच्या दुकानातून या विद्वानांनी ही दस्तऐवजांची चिटोरी गोळा केली होती. त्यांच्यावरचा मजकूर होता मोडीत आणि भाषा होती फारसीमिश्रित मराठी! 'अज रक्तखाने खुदायेवद खान अलीशान खाा अफझलखान माहमदशाही खुष्दियाम दौलतहू ताा लिगीलेटी मोकदम व आदिकासेटी कारर्णी व येमाजी पटेल व लखणा अखतवकल काा अफजलपूर माहेदिरी बिदानद सुाा सन समस समसैन अलफ आरीजा पाठविले ते पावोन मजमून खतिरेजी आली!' लागला काही अर्थ? पण मंडळात ग. ह. खरे, शं. ना. जोशी, दत्तो वामन पोतदार, वा. सी. बेंद्रे, देवीसिंग चौहान असे मातब्बर तज्ज्ञ जमा झाले होते. त्यांनी या जुन्या दस्तऐवजांचा इतका कसून अभ्यास केला होता की, एखादे नवे पत्र समोर आले की, त्याची प्राथमिक पाहणी करून ते पत्र अस्सल की नक्कल, कोणी, कोणास, कधी पाठवले, शिक्का आणि मोर्तब दोन्ही रीतसर आहेत, की नाहीत ह्यांचा निर्णय ते करीत. या पद्धतशीर अभ्यासातूनच शिवाजीराजांच्या संबंधातील अमूल्य साधनसामग्री लोकांसमोर आली. शिवकालीन पत्र–सार–संग्रहाचे तीन खंड, शिवचरित्रसाहित्याचे दहा खंड, ऐतिहासिक फारसी साहित्याचे चार खंड इतके कागद मंडळाने लिप्यंतर व भाषांतर यांच्यासहित प्रसिद्ध केले. बाबासाहेबांनी या मुनिवर्यांची शागिर्दी करीत या सर्व साहित्याचा सांगोपांग अभ्यास केला.








मंडळाची संशोधनाची शिस्त फार बिकट होती. दस्तऐवजांतील वाक्या-वाक्याचा काथ्याकूट होई. सुहूर सन, फसली सन, शालिवाहन शक, राज्याभिषेक शक इत्यादी नाना सनावळयांनुसार दिलेल्या तारखा, तिथ्या, वार यांचा मेळ जंत्र्यांच्या साहाय्याने घालताना वादांना वर्दळीचे रूप येई. शिवजन्मतिथीचा वाद, मराठे अटकेपार खरोखर गेले की नाही याबद्दलचा वाद हे मंडळातील संशोधकांनी मोठ्या ईर्षेने आणि पोट-तिडिकेने लढवले होते. हो, असाच आणखी एक वाद म्हणजे 'शिवाजी-राजे साक्षर होते की नाही', या विषयावरचा! डफ, एल्फिन्स्टन इतकेच नव्हे, तर यदुनाथ सरकारही शिवाजीराजांच्या साक्षरतेविषयी शंका घेत असत.

संशोधकांचा हा आग्रह असे की, जे काही मांडावयाचे ते थोडक्या शब्दांत व नेमकेपणाने मांडावे. फाफट पसारा नको. मोघम आणि अघळपघळ लिहाल तर संदेह निर्माण होईल. 'संदेह नको' हे या पंडितांचे ब्रीद वाक्य होते. एकदा शंकरराव जोशी बाबा पुरंदऱ्यांना (तेव्हा ते बाबासाहेब झालेले नव्हते.) मजकूर सांगून लिहून घेत होते. बाबांनी एक शब्द चुकीचा लिहिला आणि ते तो शब्द टाकाने रेघा मारून खोडू लागले. शंकरराव म्हणाले, "बाबा, तसे खोडू नकोस. संदेह राहील." त्यांनी बाबांच्या बोटाला शाई लावून त्याचा ठिपका त्या चुकीच्या शब्दावर उमटवला! खऱ्यांनी कुठल्याही पुस्तकाचे परीक्षण केलेले असो, शेवटी असा शेरा यायचाच, की लेखकाने पुस्तकातील मजकूर झाडून झटकून घेतला असता, तर पुस्तक निम्म्या पानांत लिहून झाले असते.

बाबासाहेब ही शिस्त अंगी बाणवत शिकत गेले. या शिस्तीला चिकटून शिवाजीमहाराजांचे काटेकोर चरित्र त्यांनी लिहिले व एका मासिकातून त्याची प्रकरणे प्रसिद्धही होऊ लागली. तेव्हा बाबासाहेबांच्या लक्षात आले की, अशा तऱ्हेच्या चरित्राकडे वाचक आकृष्ट होत नाही. त्याला ते रूक्ष आणि कंटाळवाणे वाटते. म्हणून त्यांनी इतिहासाविषयी लिहिण्याचा नवाच प्रघात पाडला. 'पुरंदऱ्यांची दौलत' या कथासंग्रहाच्या प्रस्तावनेत त्यांनी सांगितले आहे. 'ह्या संग्रहातील कथा म्हणजे ऐतिहासिक घटनांना दिलेला कथेचा आकार आहे. हा काही अगदी काटकोर इतिहास नव्हे. ऐतिहासिक अस्सल साधने आणि बखरी यांत सापडलेल्या घटना मी ललित ऐतिहासिक भाषेत मांडत आहे. संवाद आणि वर्णन जिथं जिथं मला अस्सल मिळाली, ती मी वापरली आहेत. पण सुसंगत 'कथा' सांगण्यासाठी जिथं ती नव्यानं घातली आहेत, तीही जास्तीत जास्त 'ऐतिहासिक पथ्य' सांभाळून व सत्याच्या अनुरोधाने घातली आहेत'

(३)

महाराजांच्या चरित्राला संतमहात्म्यांच्या उपदेशाचे कोंदण हवेच हवे. न्यायमूर्ती रानड्यांनी मराठ्यांच्या इतिहासाचे तात्त्विक विवेचन करणारा पहिला ग्रंथ लिहिला. त्यात म्हटले होते की, ज्ञानेश्वरांपासून तुकोबांपर्यंत संतांनी मराठी समाजाची जी मशागत करून ठेवली, तिचा फायदा घेऊन शिवाजीमहाराजांनी स्वराज्य उभे केले. बाबासाहेब हे सोपानदेवांच्या समाधीच्या नगरात वाढले. वारी सासवडावरूनच दरवर्षी पंढरपुराकडे जाई. खंडोबाची जेजुरीही जवळच. त्यामुळे बालपणापासून बाबासाहेबांना संतांच्या उपदेशाचा लळा लागला होता. ज्ञानेश्वरीतील ओव्या, तुकारामाचे अभंग आणि रामदासी श्लोक ऐकत आणि म्हणत त्यांचे विचार व भाषा पक्की झाली. 'काही एक उत्कटेवीण। कीर्ती कदापि नव्हे जाण। उगेचि वणवण हिंडोन। काय होते?' या समर्थवाणीचे मर्म त्यांनी ओळखले व शिवाजीमहाराजांची उत्कट भक्ती स्वीकारली.

स्वराज्याची पृष्ठभूमी संतांच्या शिकवणीतून तयार झाली, तर उभारणी शिवकालीन घराण्याच्या पाठबळाने शक्य झाली. कान्होजी जेधे, बाजी पासलकर, महादजीपंत पुरंदरे यांसारख्यांनी वीतभर स्वराज्याचे रक्षण करण्यासाठी राजांना सर्वतोपरी मदत केली, म्हणूनच राजांच्या राज्याभिषेकाच्या वेळी लंबेचवडे स्वराज्य पसरले आणि दक्षिणदिग्विजयाची शक्यता निर्माण झाली. शिवकालीन घराण्यांचे बाबासाहेबांना अप्रूप वाटते, ते यामुळेच. जेधे, पासलकर, कंक, भोईटे, जगताप अशा घराण्यांच्या वंशावळी बाबासाहेबांना मुखोद्गत आहेत. त्यांच्या आजच्या वंशजांकडे ते इतिहासाच्या इमल्याचे झरोके आहेत असे मानून पाहतात. खुद्द शिवाजीराजांची घराणी म्हणून कोल्हापूरकर व सातारकर भोसले ही त्यांची दैवतेच आहेत. 'राजा शिवछत्रपती' हे महाराजांचे रसाळ चरित्र

त्यांनी 'राजमाता सुमित्राराजे भोसले महाराणीसाहेब महाराज, सातारा' यांनाच अर्पण केले आहे.

ज्या प्रदेशातून स्वराज्य जन्माला आले, त्याच्या भूगोलाची खडान् खडा माहिती, बखरी, करीते, कैफियती, शकावल्या, पोवाडे, पत्रे आणि शिवभारतासारखी काव्ये यांचा सखोल अभ्यास; ज्यांच्या उपदेशातून राजांना स्वराज्य स्थापण्यासाठी आत्मिक बळ मिळाले त्या संतवाङ्मयाची जवळून ओळख; आणि ज्या माणसांतून व ज्या माणसांसाठी स्वराज्य रचले, त्या माणसांच्या समाजाचे व संस्कृतीचे मूलगामी आकलन अशी चहू अंगांनी तयारी झाली, तरी बाबासाहेबांनी एकदम शिवचरित्राला हात घातला नाही. त्यांनी प्रथम शिवचरित्रावर व्याख्याने द्यायला सुरुवात केली. त्यासाठी त्यांनी साऱ्या महाराष्ट्राची दोन-तीनदा पिंजण केली आणि शिवछत्रपतींचे गौरवशाली व प्रेरणादायी चरित्र घराघरांतून पोचवले. पुरंदऱ्यांच्या शिवचरित्रावरील व्याख्यानमाला गावोगावी झाल्या. हजारोंच्या संख्येने श्रोतृसमाज गोळा होई आणि महाराजांच्या अद्‌भुत पराक्रमांचे वर्णन बाबासाहेबांच्या मनमोहिनी वाणीतून ऐकताना थरारून जाई. बाबासाहेबांच्या वक्तृत्वाची पकड ऐकणाऱ्यांना आपल्या कबजात घेई. प्रतापराव गुजरांच्या नेसरीतील लढाईचे वर्णन सांगताना बाबासाहेब सहजच कुसुमाग्रजांची 'सात' ही हेलावून टाकणारी कविता गंभीर स्वरात म्हणू लागत :

'दगडावर दिसतील अजुनि तेथल्या टाचा<br>ओढ्यात तरंग अजुनि रंग रक्ताचा<br>क्षितिजावर उठतो अजुनि मेघ मातीचा'

ह्या ओळी गाताना बाबासाहेब आपले हात खाली, बाजूला, क्षितिजाकडे नेत आणि श्रोत्यांच्या नजरा त्या त्या दिशेने आपसूक वळत. मग बाबासाहेब हलक्या आवाजात, कुजबुजल्यासारखे उच्चारत–

'अद्याप वीराणी कुणि वाऱ्यावर गात<br>वेडात मराठे वीर दौडले सात!'

सगळा मनुष्यसमुदाय थरारून जाई आणि काही क्षणांच्या स्तब्धतेनंतर टाळ्यांचा कडकडाट होई!

बाबासाहेब पुरंदऱ्यांच्या व्याख्यानांमुळे सारा महाराष्ट्र महाराजांच्या प्रेमाने उचंबळून आला. डोंगरदऱ्यांतून हिंडणे, दुर्ग-किल्ल्यांवर साहसी सहली काढणे, अवघड कडे दोराच्या साहाय्याने चढणे-उतरणे, महाराज जिथंजिथे गेले त्या ठिकाणांची यात्रा करणे, आग्र्यापासून राजगडापर्यंत महाराज ज्या वाटेने आले (अशी समजूत आहे), त्या वाटेने चालत येणे असे नाना अनवट आणि धाडसी छंद तरुणांनी जोपासले. त्यांच्या अनुषंगाने छायाचित्रण, वन्य जनावरांची आणि वनस्पतींची जोपासना, किल्ले स्वच्छ करण्याची मोहीम ह्याही गोष्टी गेल्या दोन पिढ्यांनी हाताळल्या. पर्यावरण आणि निसर्ग यांच्या विषयी प्रेम आणि त्यांचे जतन करण्याची इच्छा ह्या-देखील या छंदांच्या मार्गानेच लोकांपर्यंत पोचल्या. पुरंदरे हेच या सगळ्याचे प्रेरणास्थान होते, ही गोष्ट आता आपण अतिपरिचयामुळे विसरून गेलो आहोत.

(४)

त्यानंतर बाबासाहेबांनी 'राजा शिवछत्रपती' हे शिवाजीराजांच्या चरित्राचे आख्यान मांडले, त्याची सुरुवातच 'चंडमुंडभंडासूरखंडिनी जगदंबे, उदंडदंड महिषासुरमर्दिनी दुर्गे, महाराष्ट्रधर्म रक्षिके तुळजाभवानी ये! सुदिन सुवेळ मी शिवरायाच्या जन्माच्या जन्माचं आख्यान मांडलंय. आई, तू ऐकायला ये।' अशा आमंत्रणाने केली असून समग्र चरित्राचा बाजच मुळी एका स्फूर्तिदायक आख्यानाचा आहे. भाषेला एकाच वेळी प्रेरक वक्तृत्वाची आणि पारंपरिक पोवाडे–ओव्या–आर्या यांची डूब आहे. आधीच शिवाजीराजांचे दीप्तिमान चरित्र आणि तेही कमावलेल्या भाषेच्या भरजरी शेल्याने वेष्टून लोकांपुढे आलेले, त्यामुळे त्याने लोकप्रियतेचे उच्चांक मोडले, यात काहीच नवल नव्हते. महाराजांच्या चरित्रलेखनाचा ते चरित्र हा एक झगझगीत मानदंड झाला.

पण शिवचरित्र एवढीच बाबासाहेबांची कामगिरी नाही. वर सांगितल्याप्रमाणे गेल्या दोन–तीन पिढ्यांवर त्यांनी केलेले शिवाजीराजांच्या अलौकिक पराक्रमाचे संस्कार हे त्यांचे चिरस्थायी कार्य आहे. ते संस्कार इतके प्रेरणादायी आहेत की, ते पुढच्या पिढ्यांकडे साहजिकच पोचणार आहेत. बाबासाहेबांनी जो शिवचरित्राचा कल्लोळ मराठी मनात निर्माण केला, तो विरून जाणारा नाही. त्यामुळेच बाबासाहेबांना 'महाराष्ट्रभूषण' हा किताब देऊन महाराष्ट्राने आपली कृतज्ञता व्यक्त करण्यात औचित्य आहे.










बाबासाहेब आता चौऱ्याण्णव वर्षांचे आहेत. त्यांनी शंभरी पार करावी, ही अपेक्षा काही अवाजवी होणार नाही. या उरलेल्या वर्षांचे दिवस मात्र हजारहजार असावेत! इतिहासाच्या मंदिरासमोर पुरंदऱ्यांच्या रूपाने जी दीपमाळ उभी राहिली आहे, तिने चिरंतन प्रकाश द्यावा.

शिवशाहीर, तुम्हाला मानाचा मुजरा!!





अनुक्रमणिका








# साक्षेपी विचारवंत – शेषराव मोरे

बालाजी चिरडे

श्री. शेषराव मोरे यांची दि. ४-५ सप्टेंबर २०१५ रोजी अंदमान येथे होणाऱ्या विश्वसाहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी निवड झाली, याचा नांदेडकरांना आनंद होणे स्वाभाविक आहे. रूढार्थाने साहित्यिक नसलेल्या, एकही कादंबरी, कथा, कविता, नाटक वा समीक्षा न लिहिणाऱ्या मोरेंना हा सन्मान मिळतो आहे, ही मराठी सारस्वतांच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाची, आनंदाची व अभिनंदनाची बाब आहे. यापूर्वीच त्यांच्या अनेक ग्रंथांना शासनमान्यता व समाजमान्यता मिळालेली आहे. साहित्यिकांना आवश्यक असणारी प्रतिभा, एखादा विषय समजून घेण्यासाठी अचाट परिश्रम व त्याग करण्याची तयारी, एखाद्या सृजनशील अभियंत्याप्रमाणे सुंदर विचारवास्तू उभी करण्याची हातोटी आणि अफाट बुद्धिमत्ता, तटस्थपणे विचार करण्याची पद्धती या गुणांमुळे त्यांचे लेखन महाराष्ट्राच्या मराठी वैचारिक साहित्यातील एक मैलाचा दगड ठरणारे आहे.

शेषराव मोरे यांचा २६ वर्षांचा लेखनप्रवास म्हणजे एक विचारयात्राच आहे. १९८८ पासून २०१२ पर्यंत त्यांची १४ पुस्तके प्रकाशित झालेली आहेत. त्यांच्या प्रत्येक ग्रंथाने मराठी साहित्यामध्ये काहीतरी भरीव असे योगदान दिलेले आहे. 'सावरकरांचा बुद्धिवाद : एक चिकित्सक अभ्यास' या १९८८ सालच्या ग्रंथाने त्यांचा लेखनप्रवास चालू झाला. यापूर्वी अनेक वर्षे सावरकर हा त्यांच्या चिंतनाचा विषय राहिलेला होता. सावरकरांच्या विचारविश्वाने त्यांना झपाटून टाकले. शालेय जीवन असो, की महाविद्यालयीन सावरकर मंडळ स्थापन करणे, व्याख्यान देणे, राष्ट्रीय ज्वलंत विषयांवर लेख प्रकाशित करणे, वाद व चर्चा करणे या मार्गाने त्यांनी हा विषय पचवला, मुरवला. पुरोगामी महाराष्ट्रात सावरकरांबद्दल काय बोलले जाते, काय विचार केला जातो, त्यांच्या विचारांची मोडतोड करून अप्रामाणिकपणाने कसे लेखन केले जाते, सावरकरांचे आंधळे भक्त व विरोधक यांच्या दुहेरी कचाट्यातून सावरकरांना मुक्त करण्याचा, त्यांच्या विचारांभोवतीची अनेक पुटे बाजुला करून शुद्ध बुद्धिवादी, कोणताही धर्म न मानणारा, सर्व धर्मग्रंथ कालबाह्य ठरविणारा, एक व्यक्ती एक मत याचा प्रथम पुरस्कार करणारा, हिंदुत्व म्हणजे हिंदू लोकांचे ऐक्य व हित हे सांगणारा, त्याची सर्वप्रथम व्याख्या करणारा थोर बुद्धिवादी विचारवंत म्हणून सावरकरांचा परिचय करून दिला. तत्कालीन नियतकालिक 'सोबत'चे निर्भीड संपादक ग. वा. बेहरे यांनी प्रास्ताविक लिहिले. या प्रथम ग्रंथाचे विमोचन शिवसेनाप्रमुख बाळासाहेब ठाकरेंच्या हस्ते झाले. या पहिल्यावहिल्या ग्रंथानेच त्यांना खरी ओळख दिली. ४० वर्षांच्या या तरुण लेखकाच्या बुद्धीला व अपार कष्टाला स. ह. देशपांडे, ना. य. डोळे यांच्यासारख्या विचारवंतांनी मनापासून आशीर्वाद दिले. पाहता पाहता त्यांच्या लेखणीने उभा मराठी मुलूख पादाक्रांत केला. 'सावरकरांचे समाजकारण' या ग्रंथात पुरोगामित्वाची झूल पांघरून वैचारिक लबाड्या करणाऱ्या तत्कालीन थोर विचारवंतांचीही भीडमुर्वत न ठेवता त्यांचा वैचारिक अप्रामाणिकपणा मोरेंनी जगजाहीर केला.

विद्यार्थिदशेपासून आजपर्यंत त्यांची ज्ञानसाधना अखंडितपणे चालू आहे. याच ज्ञानसाधनेला वेळ अपुरा पडतो म्हणून त्यांनी शासकीय तंत्रनिकेतन महाविद्यालयातील प्राध्यापकाची नोकरी सोडली व स्वेच्छानिवृत्ती घेऊन १९९४ पासून पूर्णवेळ अभ्यास व लेखनासाठी वाहून घेतले. त्यांनी हाताळलेल्या प्रत्येक विषयाची एक कथा (खरं म्हणजे व्यथा) आहे. त्यांच्या प्रत्येक ग्रंथाची प्रसववेदना निराळी आहे. ते रूढार्थाने लेखकच नाहीत. अल्पकाळात, फावल्या वेळात, वेळ मिळेल तेव्हा, कधी कधी लिहिणारे, नोकरी वा व्यवसाय सांभाळून, तासिका घेऊन, घरची इतर हजार कामे करीत, करमणूक, सहली, मनोरंजन करवून घेत, जेवढे

अनुक्रमणिका






होईल तेवढे लेखन करणे असा त्यांचा स्वभावच नाही. इतरांनी लिहिलेले, लोकांना बऱ्यापैकी ज्ञात असलेले कोणतेही विषय त्यांनी हाताळले नाहीत. लोकांना अज्ञात असणारा, पण लोकांच्या अत्यंत उपयोगाचा, लोकांना अप्रिय वाटणारा पण अंतिमतः हितकारक असणाऱ्या अशाच विषयाला ऐरणीवर घेतले. नरहर कुरुंदकरांच्या विचारांनी प्रभावित झालेल्या शेषराव मोरे यांचा एकदा एका विषयाचा अभ्यास करावयाचा ठरला, की त्याची योजना तयार करणे, किती दिवसांत हा प्रकल्प हातावेगळा करायचा याचे नियोजन करणे, तत्संबंधित भारतात उपलब्ध असलेले संगळे ग्रंथ विकत घेणे किंवा छायाप्रती करून घेणे, त्यांची पारायणे करणे, टिपणे काढणे, लेखनाच्या चार-चार फेऱ्या करणे, अशा प्रकारे जास्तीत जास्त निर्दोष, सकस, उत्तम, उपयोगी, सर्वसामान्य वाचकाला कळतील अशा विषयांवरच त्यांनी लेखन केलेले आहे. ते अभियंता आहेत. त्यांनी आपली सगळी अभियांत्रिकीची कौशल्ये विचारवास्तू उभ्या करण्यासाठी वापरलेली आहेत. एखादा वास्तुविशारद कोणत्याही जमिनीच्या तुकड्यावर सुंदर वास्तू उभी करतो, तशी अनेक शैलींतील विचारवास्तू त्यांनी उभी केली. अनेक वादग्रस्त वाटू शकणारे विषय भरभक्कम पुराव्यांनी त्यांनी उभे केले आहेत. त्यामुळेच दुर्मीळ किंवा अभिजात मराठी साहित्यकृतींच्या वाट्याला येणारा एकाहून अधिक आवृत्त्यांचा योग मोरेंच्या अनेक ग्रंथांना लाभला. एखादा कवी, कादंबरीकार, नाटककार यांना जेवढे प्रेम लाभावे, तेवढेच प्रेम एका विचारवंतालाही लाभावे, हे महाराष्ट्राच्या वैचारिक जागृतीचे लक्षण म्हणायला हवे. त्यांच्या लेखनावर प्रगाढ विश्वास व आदर असणारे राजहंस प्रकाशनाचे श्री. दिलीप माजगावकर यांनी तर त्यांच्या अनेक ग्रंथांना विविध योजनांच्या माध्यमातून विश्वातील कानाकोपऱ्यांत राहणाऱ्या मराठी वाचकांपर्यंत पोचवले. त्यांच्या अत्यंत निगर्वी, प्रसिद्धीपराङ्मुख, निरलस व लोभस अशा स्वभावामुळे त्यांचा एक स्वतंत्र चाहता वर्ग महाराष्ट्रात निर्माण झालेला आहे. त्यांच्या सर्व साहित्यावर चर्चा येथे करता येणार नाही; पण काही विशेष ग्रंथांचाच विचार करायला हवा. काहीतरी नवे शोधून काढण्याचा दावा करणे हा त्यांचा लेखनस्वभाव नाही. जे तुमच्या-आमच्या समोर आहे, जे वाङ्मय प्रसिद्ध झालेले आहे, त्याचेच पुनःपरीक्षण करून नवा दृष्टिकोण समाजाला देणे हा त्यांचा पिंड आहे. त्यांचे ग्रंथ वाचायला घेतले, की आपण काहीतरी नवे वाचल्याची आणि त्यांच्या ग्रंथाने आपल्या दृष्टिकोणात मोलाची भर घातल्याची अनुभूती वाचकांना येते.

सावरकरांनंतर त्यांनी काश्मीर विषय अभ्यासाला घेतला आणि राजहंसने हा ग्रंथ गाजवला. त्याच्या आतापर्यंत चार आवृत्त्या प्रकाशित झाल्या. काश्मीर ज्यांना समजावून घ्यायचा आहे, त्यांना मोरेसरांच्या ग्रंथाला टाळून पुढे जाताच येणार नाही. काश्मीर हे फाळणीच्या तत्त्वाप्रमाणे पाकिस्तानात जायला हवे होते. तत्कालीन गव्हर्नर जनरल माउंटबॅटन, पं. नेहरू, म. गांधी व सरदार पटेल या सगळ्यांची इच्छाही अशीच होती. पण तेथील संस्थानिक महाराजा हरिसिंगांना भारतात यायचे होते. तेथील जनतेचे हृदयसम्राट शेख अब्दुल्ला यांना भारतातही यायचे नव्हते व पाकिस्तानातही जायचे नव्हते. त्यांना आझाद काश्मीर हवे होते. सार्वमत घेतल्यावर लोक पाकिस्तानात जाणार व त्यामुळे प्रचंड दंगली भारतात होणार व त्यात मुसलमानांच्या प्रचंड कत्तली होणार, असा अमेरिकन गुप्तचर संस्थेचा अहवाल आल्यामुळे भारतीय मुसलमानांच्या संरक्षणासाठी काश्मीरमध्ये सार्वमत घेण्यात आले नाही. येणार नाही. उर्वरित भारतातील जनतेने हा प्रश्न भावनिक केल्यामुळे हा तिढा अजूनच गुंतागुतीचा कसा झाला आहे, हे त्यांनी सांगितले.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे समग्र साहित्य महाराष्ट्र शासनाने प्रकाशित केले. त्या प्रकाशित ग्रंथांचा व साहित्याचा परामर्श घेणारा त्यांचा 'डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे सामाजिक धोरण : एक अभ्यास' हा ग्रंथही खूप महत्त्वाचा आहे. नांदेडचे सुप्रसिद्ध नाटककार दत्ता भगत यांची प्रस्तावना या ग्रंथाला आहे. या ग्रंथाचे वैशिष्ट्य म्हणजे बाबासाहेबांच्या भूमिकेला छेद देणारे किंवा पूर्वी मांडलेल्या विचारांशी विसंगत असलेले साहित्य. एरव्ही बाबासाहेबांनी प्रकाशित करण्यास परवानगी दिली नसती, असे साहित्य प्रकाशित करून एका अर्थाने आपण बाबासाहेबांवर अन्याय करीत आहोत,

हेच त्यांनी या ग्रंथात अधोरेखित केलेले आहे. या ग्रंथामध्ये डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे विविध सामाजिक विचार उदा., चातुर्वर्ण्य व्यवस्था, धर्म, जात, अस्पृश्यता, धर्मांतर इत्यादी दिलेले आहेत त्याप्रमाणे हे त्यांच्या ध्येयाप्रमाणे त्यांच्या विचारांत झालेल्या परिवर्तनांचा आलेख या ग्रंथात दिलेला आहे.

त्यांच्या लेखनातील सगळ्यात महत्त्वाचा व खऱ्या अर्थाने मराठी साहित्यात गत १००० वर्षांत त्यांनी नव्याने आणलेला विषय म्हणजे इस्लाम. 'मुस्लिम मनाचा शोध' (इ. स. २०००) या ग्रंथावर त्यांनी रोज १८ तास या प्रमाणे ५ वर्षे काम केले. एकतर इस्लाम हा विषय अत्यंत संवेदनशील, त्यात एक सावरकरअभ्यासक इस्लामवर लिहिणार, या सर्व बाबी रोमांचकारकच म्हणायला हव्यात. त्यांचो अफलातून अशी अभिप्राय आवृत्तीची कल्पना. जमाते हिंदच्या अभ्यासकांनी आपल्या मतभेदांसह ग्रंथ प्रकाशित करण्यासाठी दिलेले ६० पृष्ठांचे अभिप्रायपत्र... हे सगळे केवळ मोरेच करू शकतात. या ग्रंथातील त्यांचे हिमालयासारखे कष्ट पाहून कोणीही नतमस्तक होईल. त्यांची महाराष्ट्रातील कमीत कमी २०० व्याख्याने केवळ इस्लामवर झाली आणि त्यांतील बहुतेक मुसलमान संस्थांनीच आयोजित केलेली होती. इस्लामवर इतका अभ्यासपूर्ण ग्रंथ कोणताही वाद न होता, मुसलमानांच्या भूमिकेत जाऊन त्यांनी लिहिल्याबद्दल मराठी वाचक त्यांचे शतशः ऋणी राहतील. आरंभी काही उजव्या विचारसरणीच्या लोकांना हा ग्रंथ कसा वाचावा हेच न कळाल्यामुळे अनेक गैरसमज पिकविण्यात आले. त्यांच्या या ग्रंथाला तत्कालीन (काँग्रेस) सरकारने राज्य पुरस्कार देऊन गौरव केला. मुसलमान हे आमचे मित्र, बंधू; पण कधीही आपण त्यांचा धर्म समजावून घेण्याचा प्रयत्न केला नाही. हा देश एकसंध राहायचा असेल, येथील लोकशाही चिरायू करावयाची असेल, तर आपल्या सख्ख्या शेजाऱ्यांचा धर्म समजावून घ्यावा लागेल, या उदात्त भूमिकेतून लिहिलेल्या त्यांच्या या ग्रंथाने मराठी साहित्यात ज्ञानाचे एक नवे दालन खुले झाले, हे अमान्य करता येणार नाही.

जगभरातील मुसलमानांमध्ये कोणतेही मतभेद (शिया, सुन्नी, कादियानी इ.) असले, तरी मूळ इस्लामबद्दल कोणताही मतभेद त्यांच्यात नाही. हा मूळ इस्लाम समजावून घ्यायचा तर प्रेषित महंमद पैगंबरांचे चरित्र, पवित्र कुराण व हदिस (प्रेषितांची उक्ती व कृती) या तिघांचा एकत्रित अभ्यास केल्याशिवाय इस्लाम समजत नाही. एखाद्या धार्मिक मुसलमानाने आपल्या धर्माबद्दल श्रद्धेने सांगावे, तसे निवेदन या ग्रंथात करण्यात आले आहे. त्यामुळे प्रेषितांचे मक्का काळ, मदिना काळ, कुराण परिचय, अल्लाच्या कार्यासाठी संघर्ष म्हणजेच जिहाद, पूर्वप्रेषितांच्या कथा, शांतता, सहिष्णुता, बंधुता यांचा मोरेंनी काढलेला अर्थ पाहून अनेक मुस्लिम अभ्यासकांनी त्यांच्या प्रतिपादनाला सलाम केलेला आहे. हा ग्रंथ वाचल्यावर इस्लाम कळाल्याचा आनंद झाल्याशिवाय राहत नाही. ज्यांनाज्यांना भारताचा १००० वर्षांचा इतिहास अभ्यासावयाचा आहे, त्यांना इस्लाम समजून न घेता हा काळ समजणार नाही. त्यामुळे इस्लाम म्हणजे मध्ययुगाच्या अभ्यासाची गुरुकिल्लीच होय आणि ती मराठी वाचकांच्या हातात दिल्यामुळे ज्ञानेश्वरमाउलींनी भगवद्गीतेला मराठीत आणून जी क्रांती केली, त्याहून ही खचितच कमी महत्त्वाची क्रांती नव्हे.

अत्यंत कष्टाने लिहिलेला, मात्र वाचकांनी अद्यापही गंभारपणे न घेतेलेला त्यांचा दुसरा ग्रंथ म्हणजे 'प्रेषितांनंतरचे चार आदर्श खलिफा अर्थात इस्लामचा सुवर्णकाळ.' प्रेषित महंमदांनंतर झालेले ४ खलिफा अबू बकर, उमर, उस्मान व अली यांच्या ३६ वर्षांचा रोमहर्षक इतिहास यात मांडला आहे.

१८५७ चा उठाव म्हणजे मराठी वाचकांचा अभिमानबिंदू. त्यात सहभागी झालेली राणी लक्ष्मीबाई, तात्या टोपे, नानासाहेब पेशवे या (अनिवासी) मराठी नायकांमुळे या उठावाशी मराठी माणूस नाते जोडतो. सत्तावनच्या उठावाच्या शतकोत्तर सुवर्णजयंतीच्या निमित्ताने (१८५७ ते २००७) सावरकरांचा हाच अभ्यासक 'सत्तावनचे स्वातंत्र्यसमर' या ग्रंथात १८५७कडे सावरकरांपेक्षा डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे कसे वास्तववादी दृष्टीने पाहातात, हा उठाव म्हणजे मुसलमानांनी आपली गेलेली सत्ता परत मिळविण्याचा अत्यंत महत्त्वाचा काळ असल्याचे नीट कोणीही समजावून सांगत नाहीत. भारतीय स्वातंत्र्याचा अत्यंत गुंतागुंतीचा

विषय आपल्या अभियांत्रिकी लेखनकौशल्याने त्यांनी समजावून सांगितला आहे. १८५७ च्या जिहादीपासूनच मुसलमानांनी आपले अलगत्व कसे जपले, १८८५ सारख्या काळातही सर सय्यद अहमद यांच्यासारख्या मुस्लिम विचारवंतांनी राष्ट्रीय सभेला कसा विरोध केला, त्यानंतर न्या. अमीर अली यांच्यासारख्या प्रकांड पंडितांनीही हा वारसा कसा जपला, यातून मुस्लिम लीग १९०६ मध्ये कशी जन्माला आली, जन्मापासूनच मुसलमान हे स्वतंत्र राष्ट्र आहेत म्हणून त्यांना समान सत्तेचा वाटा मिळाला पाहिजे ही भूमिका त्यांनी कशी घेतली, हा सगळा गुंता त्यांनी व्यवस्थितपणे वाचकांसमोर ठेवला आहे. विशेष म्हणजे बॅ. जिनांसारखी व्यक्ती कधीही राष्ट्रीय नव्हती, हे त्यांनी सप्रमाण सिद्ध केलेले आहे, तर मौ. आझादांसारखे राष्ट्रीय मुसलमानही अखंड भारताचाच आग्रह कसा धरीत होते व आपले डावपेच त्या दिशेने कसे रचत होते, हे ते सांगतात.

१८५७ च्या फसलेल्या जिहादीच्या प्रयोगानंतर मुस्लिम समाजाचा पाकिस्तानच्या निर्मितीपर्यंतचा इतिहास लख्खपणे वाचकांच्या समोर आला. आजपर्यंत फाळणी ही वाईटच ठरवून ती करण्याची जबाबदारी गांधींवर टाकून आपण हा इतिहास नीट समजावून घेण्यात कसे कमी पडलो, हे त्यांनी निदर्शनास आणून दिले आहे. भारत अखंड असता, तर भारताची घटना कशी राहणार होती, हा त्यांनी उपस्थित केलेला प्रश्न अभ्यासकांना निरुत्तर करणारा आहे. ज्यांना तुमची घटनाच मान्य होणार नाही, अशा मुसलमानांना जबरदस्तीने भारतात ठेवून घेण्याची कोणतीच योजना कोणाकडेही नव्हती. त्यामुळे कायदेमंडळ, कार्यकारी मंडळ, न्यायमंडळ, लष्कर या सर्व क्षेत्रांत मुसलमानांना ५० टक्के आरक्षण देणारा, केंद्र कमकुवत व राज्य शक्तिशाली करणारा, चलन, दळणवळण व परराष्ट्रधोरणाशिवाय सगळे अधिकार राज्याकडे देणारा, सर्व संस्थानिकांचे अस्तित्व अबाधित ठेवणारा अखंड भारत की, मुसलमानांच्या प्रस्थापित व घोषित इच्छेला मान देऊन फाळणी केल्यानंतरचा मजबूत केंद्र सरकार असलेला, लोकशाही स्वीकारणारा व त्यात सर्व संस्थानिकांचे अस्तित्व विलीन करणारा स्वस्थ, समृद्ध व वैभवशाली भारत यांपैकी कोणत्याही शहाण्या माणसाने ज्याची निवड करणे भाग होते तेच गांधींनी केले. त्यांच्या या ग्रंथाने गांधींबद्दलचे अनेकांचे (गैर) समज बदलले. हा ग्रंथ वाचल्यावर फाळणीच्या नावाने नक्राश्रू ढाळणाऱ्या व अखंड भारताचे ध्येय बाळगणाऱ्या अनेक राष्ट्रीय संघटनांना आत्मपरीक्षण करायला भाग पाडले. फाळणी ही २० व्या शतकातील भारतासाठीची सगळ्यांत मोठी भाग्याची घटना होती, हे निर्विवादपणे सांगण्याचे धाडस मोरे यांनी दाखवले. स्वातंत्र्यलढ्यातील अत्यंत सूक्ष्म पदर एखाद्या कसबी शल्यविशारदाप्रमाणे उलगडून दाखवून आपण अखंड भारताच्या किती मोठ्या संकटातून वाचलो, याची जाणीव व्हायला लागते. अशा दृष्टिकोणातून सर्वप्रथम लेखन करण्याचा मान मराठी साहित्याला मिळावा हाही या भाषेचा किती मोठा सन्मान आहे, हे सुज्ञ वाचकांना वेगळे सांगण्याची आवश्यकता नाही. या ग्रंथाचा प्रतिवाद करणारा ग्रंथही राजहंसनेच श्री. मा. भावेंच्या संपादकत्वाखाली प्रकाशित केलेला आहे. हाच ग्रंथ अरुण किर्लोस्करांच्या आग्रहाखातर श्री भालचंद्र पटवर्धन (ऑक्सफर्डशिक्षित अभ्यासक, पुणे) यांनी भाषांतरित केलेला आहे. लवकरच हा ग्रंथ इंग्रजी वाचकांपर्यंतही जाईल.

'दुसऱ्या पिढीचे आत्मकथन' या ग्रंथात आपल्या २००८ पर्यंतच्या लेखनप्रवासाबद्दल ते लिहितात. "मी जे लिहिले, ते कुणीतरी लिहायलाच पाहिजे होते. माझ्या बाजूने कोणताही एक विचारगट नसला, तरी कित्येक सामान्य वाचक माझ्या लेखनावर लुब्ध आहेत, याचा आनंद आहे. मी जे वास्तव मांडले आहे, ते समजून घेण्याची गरज पुढील काळात अधिक वाढलेली असेल, याची मला खात्री आहे."

अंदमान येथे होणाऱ्या विश्व साहित्य संमेलनाच्या निमित्त शेषराव मोरे, सावरकर व पोर्टब्लेअरची सेल्ल्युलर जेल असा अपूर्व योगायोग जुळून येत आहे. त्यानिमित्त त्यांना खूप खूप शुभेच्छा.



# उच्च शिक्षणाचे नवे राष्ट्रीय धोरण

एच. व्ही. देशपांडे

> भारतीय विज्ञान परिषदेच्या (Indian Science Congress) एकशे एकव्या जम्मू येथील वार्षिक अधिवेशनात डॉ. मनमोहनसिंग यांनी आपले विज्ञान-तंत्रज्ञानविषयक धोरण स्पष्ट केले आहे. ते म्हणाले "We have worked *to create a synergy of academia with research, research with industry, industry with economy and economy with well-being of our people.* All this had made our progress in science, in the last ten years, very substantial."

कोणत्याही सरकारचे उच्च शिक्षणविषयक धोरण कसेही असले तरी ते याच मूलभूत तत्त्वांवर आधारित असेल, असले पाहिजे.

प्रस्तुत विषय खूप गुंतागुंतीचा आणि व्यापक स्वरूपाचा आहे. एका लहानशा लेखात या विषयाच्या अनेक बाजूंना स्पर्श करणेसुद्धा खूप कठीण आहे. याची तीन प्रमुख कारणे आहेत. १) ज्या बाबी (प्रश्न/मुद्दे) राष्ट्रीय उच्च शिक्षणाचे धोरण ठरविण्यासाठी विचारात घ्याव्या लागतात त्या बाबी, अनेकविध स्वरूपांच्या, एकमेकांत गुंतलेल्या आणि जागतिक शैक्षणिक स्पर्धेशी निगडित आहेत. २) त्यांतील बऱ्याच धोरणात्मक बाबी अजूनही विविध प्रकारच्या विधेयकांच्या आणि विविध समित्यांच्या अहवालांच्या स्वरूपात लोकसभेपुढे, राज्यसभेपुढे प्रलंबित आहेत; आणि ३) नुकताच केंद्रसरकारमध्ये जो ऐतिहासिक स्वरूपाचा बदल झाला आहे, त्यामुळे नव्या सरकारचे नवे स्वतंत्र धोरण लवकरच प्रसिद्ध होण्याची शक्यता आहे. सर्वसाधारणपणे असे म्हणता येईल की, स्व. राजीवजी गांधी यांनी जे 'त्या वेळचे नवे' राष्ट्रीय उच्च शिक्षणविषयक धोरण ठरविले होते. (सुमारे १९८५-८६), तेच धोरण थोड्याफार फरकाने जून २०१४ पर्यंत जुन्या केंद्रीय सरकारांनी अंमलात आणले. पण आता नव्या मा. मोदीसरकारचे वेगळे उच्च शिक्षणविषयक धोरण निश्चित होत असून लवकरच ते प्रसिद्ध होईल, अशी आजची परिस्थिती आहे.

**धोरण ठरविण्यासाठीचे काही महत्त्वाचे विषय :**

उच्च शिक्षणाचे राष्ट्रीय धोरण निश्चित करताना अनेक बाबी विचारात घ्याव्या लागतात. त्यांतील काही महत्त्वाच्या बाबींचा खालीलप्रमाणे उल्लेख करता येईल

**१. उच्च शिक्षणाचे आर्थिक धोरण :** इ. सन २०१४ च्या नव्या आकडेवारीप्रमाणे आज आपल्या देशात ४४ केंद्रीय विद्यापीठे, ३०७ राज्य सरकारांची विद्यापीठे, १३० अभिमत (Deemed) विद्यापीठे, १७० खासगी विद्यापीठे, राष्ट्रीय स्तरावरील महत्त्वाच्या अशा ५० उच्च शिक्षण संस्था, राज्यस्तरावरील महत्त्वाच्या ५ संस्था अशी एकूण विद्यापीठे म्हणता येईल, अशी ७०६ विद्यापीठे आणि एकूण ३५,५३९ महाविद्यालये आहेत (युनिव्हर्सिटी न्यूज १७ मे २०१४, पृ, ४) उच्च शिक्षणातील तील एकूण विद्यार्थी संख्या १.८ कोटी इतकी असून १५ ते २४ वयोगटातील विद्यार्थ्यांचे उच्च शिक्षणातील शेकडा प्रमाण आज १८.४% इतके आहे, ते २०२० पर्यंत ३०% इतके वाढविण्याचे आपले उद्दिष्ट आहे (पृ. ५०). उच्च शिक्षणातील विद्यार्थ्यांची एकूण संख्या सन २०११-१२ मध्ये ९३ लांख ३७ हजार ६१० इतकी होती. ती आज दोन कोटींच्याही पुढे गेली आहे; ती सतत वाढते आहे. ३१ मार्च २०११ रोजी उच्च शिक्षणातील शिक्षकांची संख्या ८,८२,७८७ इतकी होती (पृ. ३१). इथे एक गोष्ट लक्षात घेणे आवश्यक आहे की, या आकडेवारीत एकवाक्यता नसते; शिवाय ती सतत बदलत असते. म्हणून २०११ च्या आकडेवारीत २०१४ अखेर खूपच वाढ झालेली आहे. ही उपलब्ध आकडेवारी देण्याचे महत्त्वाचे कारण म्हणजे यावरून एकूण उच्च शिक्षणावरील खर्चाचा काहीएक अंदाज येऊ शकतो. यात, शिक्षक व प्रशासकीय नोकरवर्गांचे वाढीव पगार, भत्ते, जवळपास २ कोटी विद्यार्थ्यांच्या

परीक्षांचा खर्च, पुस्तके, नियतकालिके यांचा खर्च, प्रयोगशाळा
आणि त्यांतील साधनसामग्रीचा खर्च, पायाभूत सुविधांचा खर्च, वीजपाणी, विविध कार्यक्रम, टेलिफोन, कम्प्यूटर्स, इंटरनेट यांचा खर्च, प्रवासखर्च हा सर्व खर्च वरील आकडेवारीच्या संदर्भात आपण लक्षात घेतला, तर आपल्याला उच्च शिक्षणाच्या आर्थिक तरतुदीच्या धोरणासंबंधी काही विचार करता येईल. (या खर्चात SC/ST विद्यार्थ्यांच्या शिष्यवृत्त्या इ. अनेक बाबींचाही विचार करावा लागतो, हेही लक्षात घेतले पाहिजे). आपल्या एकूण वार्षिक उत्पन्नाच्या (GDP) फक्त १.२२ % इतकाच खर्च आपण उच्च शिक्षणावर करतो. हा खर्च अमेरिकेत ३.१% तर काही प्रगत देशांत ४% पर्यंतही केला जातो.

अर्थातच हा खर्च आपल्याला परवडत नाही, शिवाय इतका खर्च करून त्यातून कमीत कमी अपेक्षित गोष्टीही साध्य होत नाहीत, असा नेहमीचा अनुभव आहे. म्हणूनच खासगी शिक्षणसंस्थांची मदत, खासगी विद्यापीठे, विनाअनुदानित महाविद्यालये, परदेशी विद्यापीठे, शैक्षणिक कर्ज, राष्ट्रीय उच्च शिक्षाकोष, खासगी-सरकारी भागीदारी इ. अनेक गोष्टी गेल्या १० वर्षांत पुढे आल्या. या सर्वांसाठीचे धोरण ठरविण्याची प्रक्रिया मागील केंद्रीय सरकारने सुरू केलेली आहे. त्यात दूरशिक्षण, राष्ट्रीय उच्च शिक्षण अभियान, आणि सन २०१३ मधील विज्ञान, तंत्रज्ञान आणि नवसंशोधन धोरण तयार झाले. GDP च्या २% खर्च करण्याचे मान्य करण्यात आले. 'रूसा' ची (राष्ट्रीय उच्च शिक्षण अभियान) कल्पना आली, उच्च शिक्षणासाठी नवी विद्यापीठे, कम्युनिटी कॉलेजिस, मूक्स (Massive open online courses) अशी नवी धोरणे पुढे आली. येत्या ८ वर्षांत ३५० बिलियन डॉलर्स इतकी आर्थिक तरतूद त्यासाठी करावी लागेल, हेही मान्य करण्यात आले. (यु. न्यू. १७ फे. २०१४, पृ. ११).

आज अशी परिस्थिती आहे की, उच्च शिक्षणावरील खर्चाचे काहीएक निश्चित धोरण ठरविले नाही, तर जागतिक उच्च शिक्षण आणि संशोधन क्षेत्रात आपल्याला स्पर्धेत भागही घेता येणार नाही. ही पुन्हा गुणवत्तेच्या गुलामीकडील वाटचाल ठरेल.

**२. उच्च शिक्षणाच्या गुणवत्तेचे व गुणवत्तेच्या मूल्यमापनाचे धोरण :**

कोठारी आयोगापर्यंत तरी गुणवत्तेची काळजी घेण्याचे काम विद्यापीठ अनुदान आयोगाकडे दिलेले होते. ते पुढेही सुमारे १९९० पर्यंत तसेच राहिले. पण यु. जी. सी. कडून या संदर्भात फारसे काही झाले नाही. त्यामुळे स्व. राजीवजी गांधींना इतर प्रगत देशांतील उच्च शिक्षण संस्थांच्या गुणवत्तेच्या मूल्यमापन व्यवस्था पाहून आपल्याकडेही अशी गुणवत्तेची तपासणी व श्रेणी पद्धत असावी असे, प्रकर्षाने वाटले. त्यातून प्रा. यशपाल, प्रा. वसंत गोवारीकर, प्रा. अरुण निगवेकर या क्रमाने वेगवान हालचाली होऊन 'नॅक'ची स्थापना करण्यात आली. याच काळात ज्या केंद्रीय शिखर संस्था आहेत (उदा. AICTE, MCI, ACI ), त्यांच्याकडून काही चांगल्या गोष्टींची अपेक्षा असतानाही काही झाले नाही. उलट, या संस्थांमधील (Apex Bodies of HE) भ्रष्टाचाराची अनेक मोठी प्रकरणे उजेडात आली. आज NBA पेक्षाही 'नॅक'ची विश्वासार्हता चांगली असल्यामुळे तंत्रज्ञान आणि व्यवस्थापन महाविद्यालयेसुद्धा 'नॅक'कडे वळू लागली आहेत. पण 'नॅक'च्याही आवाक्याच्या बाहेरचे हे काम आहे, हे सर्वमान्य आहे. ३१ मार्च २०११ पर्यंत फक्त १६१ विद्यापीठे आणि ४,३७१ महाविद्यालयांचेच नॅकतर्फे मूल्यमापन झालेले आहे (यू. न्यू. पृ. ९९). १९९६ पासून २०१४ पर्यंतच्या गेल्या १८ वर्षांत १०,००० महाविद्यालयांचेही 'नॅक' तर्फे मूल्यमापन झालेले नाही. त्यामुळे एकूण ७०० विद्यापीठे (वाढत जाणारी ही संख्या विचारात घेणे आवश्यक आहे) आणि सुमारे ४०,००० महाविद्यालये यांच्या मूल्यांकनाचे काम (दर ५ वर्षांतून एकदा) नॅकतर्फे होऊ शकणार नाही, हे स्पष्ट आहे. विद्यापीठांनीच हे काम आपल्या संलग्नित महाविद्यालयांसाठी करावे, अशी धोरणात्मक रचना आहे आणि त्यांची अंमलबजावणी कशीतरी ओढूनताणून करण्याचा क्षीण प्रयत्न आज होतो आहे. खरे म्हणजे यु. जी. सी., विद्यापीठे व नॅक या कोणालाही हे काम झेपत नाही, अशी स्थिती आहे.

यावर धोरणात्मक उपाय सुचविण्यात आलेले आहेत; मात्र त्यांचा विचार नव्या सरकारनेच करावयाचा आहे.

१. पदवीपर्यंतच्या महाविद्यालयांचे मूल्यांकन राज्य सरकारांकडे सोपवावे. त्यांनी त्यांची स्वतंत्र व्यवस्था करावी. आणि विद्यापीठे व पदव्युत्तर शिक्षण केंद्रांचे मूल्यमापन नॅकने करावे. त्यामुळे 'नॅक'वरचा ताण कमी होईल. याशिवाय कपील सिबल यांनी एक विधेयक लोकसभेपुढे सादर केलेले आहे; परंतु ते बराच काळ प्रलंबित आहे त्यामध्ये

२. सर्व देशभर 'नॅक' सारखे मूल्यांकनाचे काम करणाऱ्या संस्था निर्माण कराव्यात आणि त्यांवर योग्य नियंत्रण ठेवण्याचे कार्य 'नॅक' ने करावे, असा धोरणात्मक प्रस्ताव आहे. अशी व्यवस्था प्रगत देशांमध्ये आता रूढ झालेली आहे.

३. 'नॅक'चे स्वतंत्र ४ झोन्स करून त्यांना हे काम द्यावे.

### ३. संशोधनविषयक धोरण :

केंद्र सरकारने २००८ साली 'National Innovation Act' संमत करून घेतला आणि २०१० ते २०२० हे दशक 'Innovation Decade' म्हणून जाहीर केले. त्याप्रमाणे भारतीय विज्ञान परिषदेच्या जम्मू येथील १०१ व्या अधिवेशनात डॉ. मनमोहन सिंग यांनी आपले विज्ञान-तंत्रज्ञानविषयक धोरण स्पष्ट केले. ते या लेखाच्या सुरुवातीला दिले आहे. आपल्या ११ व्या पंचवार्षिक योजनेत उच्च शिक्षणासाठी जी तरतूद करण्यात आली आणि यू. जी. सी. च्या (महाविद्यालयांना मिळणाऱ्या अनुदानात भरघोस वाढ करण्यात आली. तशी ती या देशाच्या उच्च शिक्षणाच्या इतिहासात पूर्वी कधीही झालेली नव्हती.) अनुदानाचा सिंहाचा वाटा पूर्वी जो केंद्रीय विद्यापीठांना मिळत असे, तो ओघ ग्रामीण भागातील महाविद्यालयांकडे वळविण्याचे काम डॉ. अरुण निगवेकर यांनी ते या आयोगाचे अध्यक्ष असताना केले. या गोष्टी खूप महत्त्वाच्या आणि नवीन धोरणाच्या आधारे करण्यात आल्या हे आपण लक्षात घेणे आवश्यक आहे.

सन १९९० ते २००० या दशकात भारतीय संशोधन, विशेषतः शोधनिबंधांचे प्रकाशन होते, त्याच अवस्थेत (Stagnant) राहिले, २००० नंतर २००९ पर्यंत ते दुपटीने वाढले. परंतु तरीही भारताचे संशोधन निबंधांचे जागतिक स्तरावरील स्थान फक्त १२ ऐवजी ११ नंबरवर आले. २०१० साली जागतिक संशोधनातील भारताचा वाटा फक्त ३.५% इतका कमी होता. वैद्यकीय संशोधनात (औषधे ) तर तो फक्त १.९% इतका नगण्य होता. Material Sciences मध्ये तो ६.४% इतका होता, पण त्याच वेळी चीनचा वाटा २६% इतका मोठा होता, संगणकप्रणालीत आपण आपल्या कामाच्या खूप बढाया मारतो; पण त्यातही संशोधनाच्या बाबतीत आपला जागतिक स्तरावरील वाटा २.४% इतका कमी होता, अर्थशास्त्रीय संशोधनात आपला वाटा ०.७% असा नगण्य होता. तर सामाजिक शास्त्रांमध्ये तो ०.६% इतका म्हणजे जगाने काही दखल घ्यावी एवढाही नव्हता. म्हणूनच ६ व्या वेतन आयोगाच्या संदर्भात आपल्या प्राध्यापकांनी त्यांच्या कर्तव्याचा भाग दाखवून द्यायला हवा, अशी समाजातून आज मागणी होत आहे. यू. जी. सी. ने आता सर्वप्रकारच्या संशोधनासाठी कधी नव्हे अशी आर्थिक तरतूद आणि इतरही सुविधा आपल्या संशोधकांसाठी केलेल्या आहेत. संशोधनाच्या संदर्भातील आजचे धोरण निश्चितपणे चांगले आणि प्रोत्साहनपर असेच आहे, यात कोणीही शंका घेण्याचे काहीही कारण दिसत नाही.

### ४. मुक्त व दूरशिक्षणविषयक धोरण :

मुक्त आणि दूरशिक्षण तसेच म्हणजे (Massive open online course) म्हणजे (Mooc) द्वारे शिक्षण ही आता मान्यता पावलेली शिक्षणप्रणाली असून जगातील अनेक देशांनी यात खूप प्रगती केलेली आहे. कारण आता आयुष्यभर शिक्षणाचा (Lifelong Learning) काळ आलेला आहे. पण सरकारी धोरण आणि त्याची अंमलबजावणी करणारी प्रशासकीय नोकरशाही (Bureaucracy) यांचा ताळमेळ नसलेल्या आपल्या देशात याही क्षेत्रात विरोधी प्रवाह दिसतात. देशातील मुक्त विद्यापीठांना मान्यता द्यायच्या; पण त्यांच्या अकार्यक्षम कारभारामुळे त्या रद्द करावयाच्या, असा प्रकार दिसतो. यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठांसारख्या अनेक मुक्त विद्यापीठांच्या अभ्यासक्रमांच्या मान्यता काही

वर्षांपूर्वी यु.जी.सी.ने रद्द केल्या; त्यामुळे त्या विद्यापीठांच्या पदव्यांना जो सर्वत्र समकक्षता होती ती धोक्यात आली. शिक्षक आणि प्रशासकांचा हा अप्रामाणिकपणा असून त्यासाठी राजकीय पुढाऱ्यांना दोष देणे योग्य नाही. आदरणीय प्रा. राम ताकवले यांनी शिवाजी विद्यापीठाच्या दिक्षान्त समारंभात सांगितलेला किस्सा आपल्या कारभाराचा आरसाच आहे, असे मला वाटते. कोठारी आयोगाचे सचिव आणि त्यांच्या अहवालाचे आर्किटेक्ट कै. जे. पी. नाईक यांना त्या आयोगाच्या अहवालाच्या प्रसिद्धीनंतर सुमारे २० वर्षांनी (सुमारे १९८५ चे दरम्यान ) एकाने विचारले– 'तुमच्या इतक्या चांगल्या अहवालाचा काहीच कसा परिणाम आजच्या उच्च शिक्षणावर दिसत नाही?' त्या वेळी ते म्हणाले, 'आम्ही अहवाल देताना दोन गोष्टी गृहीत धरल्या होत्या– सरकारी अधिकारी (Bureaucracy) आणि उच्च शिक्षणसंस्थांमधील शिक्षक आमच्या शिफारशींना योग्य न्याय देतील आणि त्यासाठी सरकार दक्ष राहील. पण नोकरशाही आणि प्राध्यापकांनी आमचा पराभव केला.' हे सत्य कटू असले तरी ते मान्य करून असे पुन्हा होऊ नये यासाठी आपण सर्वांनी सजग राहणे ही काळाची गरज आहे.

**५. परदेशी विद्यापीठांसंबंधीचे धोरण :**

आपण WTO चे संस्थापक सभासद आहोत आणि त्यानुसार GATS करारावर आपण सही केलेली आहे. त्यामुळे शिक्षण ही पवित्र गोष्ट आहे ही आपली भारतीय संस्कृतीतील शिकवण मोडीत निघालेली असून ज्ञान किंवा शिक्षण ही जागतिक आणि स्थानिक बाजारपेठेतील एक विकाऊ वस्तू (Commodity) बनलेली आहे. IITs आणि IIMs मध्ये तसेच वैद्यकीय महाविद्यालयांमध्ये, भारतात प्रवेश मिळत नसल्यामुळे आपले हजारो विद्यार्थी परदेशात शिक्षणासाठी जात आहेत. दरवर्षी प्रत्येक विद्यार्थ्याला तिकडे १० ते १५ लाखांचा खर्च करावा लागतो. त्यामुळे अमेरिका, ऑस्ट्रेलिया, कॅनडा इ. देशांना आपले विद्यार्थी–पालक कोट्यवधी डॉलर्स देतात, त्यामुळे अशा देशांची अर्थव्यवस्था आपल्या पैशांनी आपण बळकट करीत आलेलो आहोत. याला कारण आपण गरीब आहोत म्हणून आपल्या देशात अशा व्यावसायिक शिक्षणाची आपण व्यवस्था करू शकत नाही, हे आहे. दरवर्षी आपले परदेशी शिक्षण घेणारे विद्यार्थी सुमारे ७ ते ७।। अब्ज रु. इतकी रक्कम परदेशी विद्यापीठांना देतात. ही इतकी मोठी रक्कम फक्त अमेरिकन विद्यापीठांना आपण देत असतो. इतर देशांना आपण देत असलेली रक्कम वेगळी आहे. सुमारे ८ ते ९ अब्ज रुपये ही रक्कम आपली आपण वापरून जागतिक दर्जाचे व्यावसायिक शिक्षण देऊ शकलो, तर आशियाई–आफ्रिकन देशातील विद्यार्थी भारतात येऊ शकतील व त्यांच्याकडूनही आपल्याला आर्थिक उत्पन्न मोठ्या प्रमाणावर मिळू शकेल. या दृष्टीने भारतीय उच्च शिक्षणाचे नवे धोरण नव्या सरकारने ठरविणे आवश्यक आहे.

परदेशी विद्यापीठांनी त्यांच्या शाखा भारतात सुरू कराव्यात यासाठीही केंद्रसरकारने काही कायदे करण्याचे ठरविले असून तेही विधेयक चर्चेसाठी पुढे आले आहे. परदेशी विद्यापीठांवर काही बंधने आवश्यक आहेत आणि अशी बंधने स्वीकारून खरोखरीच किती विद्यापीठे आपल्याकडे येतील, यासंबंधी काही शंका निर्माण झाल्या आहेत. काही परदेशी विद्यापीठांशी आपले करारही झालेले असून हे सहकार्य (collaboration) आता हळूहळू गती घेत आहे– एक गोष्ट इथे महत्त्वाची आहे. आपल्या भारतीय विद्यापीठांना आरक्षणांचे कायदे आणि 'नॅक'कडून मूल्यांकन करून घेणे या गोष्टी अनिवार्य (compulsory) आहेत. या आणि अशा इतर अटी मान्य करून इथे येणे परदेशी विद्यापीठांना परवडणारे होईल का? असा प्रश्न आहे. कोणतेही परदेशी विद्यापीठ नि:स्वार्थीपणे भारताला मदत करण्यासाठी इथे येईल, असे मानणे भाबडेपणाचे आहे. तिथेही त्यांचा आर्थिक स्वार्थच महत्त्वाचा असतो आणि तो असणारच आहे.

या संदर्भात बिहारमधील जुन्या नामवंत पण आज उद्ध्वस्त झालेल्या नालंदा विद्यापीठाच्या जीर्णोद्धाराची योजना अभिनव अशीच आहे. या विद्यापीठाच्या नवउभारणीत अनेक देशांचे सहकार्य आपण घेत आहोत आणि नवे जागतिक स्तरावरील एक उत्तम विद्यापीठ म्हणून त्याची नव्याने रचना सुरू झालेली आहे. पूर्वराष्ट्राध्यक्ष A. P. J. Abdul Kalam यांनी या नव्या विद्यापीठाची संकल्पना मांडली आहे. केंद्रसरकारने यासाठी

रु. २७२७ कोटीची तरतूद करून ठेवली आहे. (Indian Express 20.9.14 p. 8)

परदेशी विद्यापीठ कायदा नव्या संदर्भात अद्ययावत करून तो व्यापक करणे ही आजची प्रमुख गरज आहे.

**६. उच्च शिक्षणाचे प्रशासनविषयक धोरण :**

संलग्न महाविद्यालयांची विद्यापीठे इतरत्र कालबाह्य ठरली आहेत. इंग्लंडमध्ये आता ही पद्धत संपुष्टात आली आहे. एका एका विद्यापीठाला ४००/५०० महाविद्यालयं जोडणारी पारंपरिक पद्धत आणि या पद्धतीतील प्रशासनप्रक्रिया यांचा आता नव्याने विचार करून त्या बदलून नव्या प्रशासनपद्धतींची निर्मिती करणे आवश्यक झाले आहे. यु. जी. सी. आणि इतर १४ शिखर संस्था-उदा., AICTE, MCI, ACI इ.-बंद करून एकच 'उच्च शिक्षण आणि संशोधन विकास आयोग' स्थापन करावा, अशी प्रा. यशपाल समितीची शिफारस आहे. राष्ट्रीय ज्ञान आयोगाने आणखी नवी विद्यापीठे निर्माण करण्याची सूचना केली आहे. विद्यापीठप्रशासनात अनेक दुरुस्त्या सुचविण्यात आल्या आहेत. स्वायत्त उच्च शिक्षण संस्थांची कल्पना पुढे येऊन त्या दृष्टीने काही प्रगतीही झाली आहे. विद्यापीठांच्या विविध अधिकार मंडळांच्या सदस्यांच्या निवडणुकीवर नवीन बंधने, मर्यादा आणून निवडणुकांऐवजी तज्ज्ञांच्या नियुक्त्या करण्यावर भर देण्याच्या योजनाही सरकारपुढे विचाराधीन आहेत. यात विद्यापीठीय निवडणुकांतील राजकारणावर काही नियंत्रण ठेवण्याचा मुख्य उद्देश आहे. आपल्या उच्च शिक्षणाच्या प्रशासनाचे आजचे स्वरूप जागतिक संदर्भात निश्चितपणे कालबाह्य झालेले आहे. ते विद्यार्थिकेंद्रित असावे, असे आपण नेहमी म्हणत आलो आहोत. प्रत्यक्षात ते नोकरशाहीकेंद्रित असेच आहे. त्याचा नवीन शैक्षणिक धोरणात नव्याने विचार होणे आवश्यक आहे; 'राज्य उच्च शिक्षण परिषदांची स्थापना असा आजच्या धोरणाचा एक भाग आहे, पण त्याची अंमलबजावणी होत नाही. महाराष्ट्र सरकारच्या नव्या विद्यापीठाच्या कायद्यात तरतूद केल्यावर १२ वर्षांनी या परिषदेच्या सदस्यांची नावे जाहीर झाली; आणि आज या परिषदेचे गठण होऊन तीन वर्षे होत आली, तरी या परिषदेची एकही बैठक झालेली नाही. शिक्षक, प्राचार्यांच्या अनेक जागा (सुमारे ३० %) रिक्त आहेत. उच्च शिक्षण प्रशासनाच्या संदर्भात दरवर्षी उच्च आणि सर्वोच्च न्यायालयात अनेक खटले दाखल होत आहेत. उच्च शिक्षण प्रशासनातील भ्रष्टाचार दररोज नव्याने वृत्तपत्रात येतो आहे. नव्या सरकारकडून येऊ घातलेल्या नव्या राष्ट्रीय उच्च शिक्षणाच्या धोरणात यावर काहीतरी उपाय शोधला जावा, अशी सर्वांचीच (नोकरशाहीखेरीज) फार आग्रहाची मागणी आहे.

**७. उच्च शिक्षणाचे धोरण ठरविण्याऱ्या संस्था :**

उच्च शिक्षण हा विषय घटनेप्रमाणे राज्य आणि केंद्र सरकारांच्या संयुक्त अधिकारक्षेत्राच्या यादीत आहे. त्यामुळे केंद्राचे मनुष्यबळ विकास मंत्रालय, यु. जी. सी. व इतर १४ Apex Bodies याप्रमाणेच राज्य सरकारांच्या उच्च व तंत्रशिक्षण विभागांची खाती, राज्य उच्च शिक्षण संचालक (D H E), राज्य उच्च शिक्षण परिषदा, विद्यापीठे आणि स्वायत्त महाविद्यालये या सर्वांचा धोरण ठरविण्याच्या प्रक्रियेत महत्त्वाचा वाटा असतो. त्यामुळे या सर्वांमध्ये एकवाक्यता असणे हे खूप महत्त्वाचे आणि आवश्यक असते. आज वेगवेगळ्या राज्यांत आणि केंद्रात वेगवेगळया राजकीय पक्षांची सरकारे आहेत. त्यामुळे या सर्वांचा एकमेळ होणे ही गोष्ट वाटती तितकी सोपी नाही.

आजचे आपले उच्च शिक्षण ना धड केंद्र सरकारचे, ना घड राज्य सरकारचे, ना विद्यापीठ अनुदान आयोगाचे, ना विद्यापीठांचे, ना खासगी संस्थांचालकांचे ना धड नोकरशाहीचे. ते या सर्वांच्या नियंत्रणाखालचे. म्हणून या सर्वांचे. उच्च शिक्षण संस्थांवरील व त्यांच्या प्राचार्यांवरील हे बहुनियंत्रित नियमन (Multiplicity of control) ही आपल्या आजच्या उच्च शिक्षणाच्या प्रशासनातील खूप मोठी समस्या आहे; आणि नेमक्या याच महत्त्वाच्या बाबीकडे कोणाचेच लक्ष नाही. त्याचप्रमाणे उच्च शिक्षणाचे धोरण ठरविणाऱ्या संस्थांमध्येसुद्धा जे मतभेद आहेत, त्यांतून बरीच प्रकरणे न्यायालयात गेलेली आहेत. आजवर या खटल्यांसाठी जो वेळ, पैसा आणि शक्ती खर्च झालेली आहे त्याचा एकदा हिशोब मांडण्याची गरज आहे. तसे केले तर आपणच आपले किती प्रचंड नुकसान करून घेतले आहे, आणि त्यामुळे उच्च शिक्षणाची

गुणवत्ता कशी फरफटत चालली आहे, याची आपल्याला सम्यक कल्पना येईल. इतका प्रशासकीय गोंधळ जगातील इतर कोणत्या देशात चालू असेल, असे वाटत नाही.

**८. आजची परिस्थिती :**

आज गेल्या सरकारने तयार केलेली अनेक विधेयके लोकसभेत चर्चेसाठी प्रलंबित आहेत. त्यात सॅम पित्रोदांच्या राष्ट्रीय ज्ञान आयोगांनी केलेल्या अनेक शिफारशी आहेत, प्रा. यशपाल कमिटीचा सर्व अपेक्स बॉडीज (यू. जी. सी. सह) रद्द करून त्यांचे विलिनीकरण करून एकच 'राष्ट्रीय उच्च शिक्षण आणि संशोधन परिषदे' चा प्रस्ताव आहे. अनेक लहानमोठ्या समित्यांचे अहवाल आहेत, नव्या सरकारचा यु. जी. सी. च्या पुनर्रचनेचा प्रस्ताव आहे, 'नॅक' च्या विकेंद्रीकरणाचा प्रस्ताव आहे. सध्या केंद्र सरकारचे मनुष्यबळ विकास मंत्रालय या सर्वांची कसून तपासणी करीत आहे. यातून आपल्या उच्च शिक्षण व्यवस्थेची पुन्हा नव्याने मांडणी होण्याची खूप मोठी शक्यता आहे. कदाचित येत्या हिवाळी अधिवेशनात संसदेत या संदर्भात काही घोषणा, प्रस्ताव येण्याची शक्यताही आहे. अशा वेळी येऊ घातलेल्या नव्या उच्च शिक्षणाच्या राष्ट्रीय धोरणात खालील पाच प्रश्न केंद्रस्थानी असतील/असणे आवश्यक आहे. ते असे :

१. आर्थिक दृष्ट्या मागासलेल्या विद्यार्थ्यांना गुणवत्तापूर्ण उच्च शिक्षण कसे देता येईल?

२. समाजातील सर्वच घटकांना भटक्या विमुक्त, आदिवासी समाज घटकांना उच्च शिक्षणप्रक्रियेत कसे आणता येईल?

३. उच्च शिक्षणाची गुणवत्ता कशी वाढेल? विशेषतः एकाच समान गुणवत्तेचे उच्च शिक्षण सर्वांना कसे देता येईल?

४. समाजाच्या, देशाच्या गतिमान विकासासाठी त्वरित उपयोगी पडेल असे संशोधन कसे वृद्धिंगत करता येईल? आणि

५. एकविसाव्या शतकाच्या मध्यापर्यंत निर्माण होणाऱ्या ज्ञानाधिष्ठित जागतिक समाजनिर्मितीत आपल्या उच्च शिक्षणाचे योगदान काय असेल? त्या समाजामध्ये (Global knowledge society) भारताचे स्थान आणि कार्य काय असेल?

या प्रश्नांच्या समाधानकारक उत्तरांसाठी नवे राष्ट्रीय उच्च शिक्षणविषयक धोरण कसे सिद्ध होईल, याकडे आपण सर्वांनी सतत सजगतेने पाहिले पाहिजे आणि या प्रक्रियेत शक्य त्या प्रमाणात सहभागीही असले पाहिजे.



# हार्डी आणि रामानुजन-दोन प्रसिद्ध गणितज्ञ

अशोक जोशी

जी. एच. हार्डी हे ब्रिटिश गणिती व रामानुजन हे भारतीय गणिती हे दोघे एका दंतकथेचा-लिजंडचा-भाग बनले आहेत. हार्डी या विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात सुप्रसिद्ध असलेल्या गणितज्ञाने रूढ अर्थाने गणिताचे फॉर्मल शिक्षण न झालेल्या एका भारतीयाचे गणितातले संशोधन गंभीरपणे घेणे हे विलक्षण व आश्चर्यकारक होते. इतर काही गणितज्ञांनी जे संशोधन पाहणेच नाकारले, ते हार्डीनी गंभीरपणाने पाहिले, वाचले. ते महत्त्वाचे आहे व रामानुजनमध्ये एका प्रतिभाशाली गणितज्ञाची बुद्धिमत्ता आहे, हे हार्डी व त्यांचे सहकारी प्रा. लिटलवुड यांनी जाणले. रामानुजनना केंब्रिज विद्यापीठात बोलावले, त्यांना नव्या पद्धतीचे गणितातले ज्ञान मिळाले पाहिजे या दृष्टीने प्रयत्न केले. त्यामुळे जागतिक दर्जाच्या गणितज्ञांशी त्यांचा संवाद होऊ शकला व ते जागतिक दर्जाचे प्रसिद्ध गणिती झाले. त्यांचे शोधनिबंध लक्षणीय ठरले व एक प्रतिभावंत गणिती म्हणून ते गाजले. स्वतंत्र भारताने रामानुजन यांचा मरणोत्तर मोठा गौरव केला, ही घटनाच त्यांचे मोठेपण स्पष्ट करते.

हार्डी व रामानुजन यांच्यासंबंधी लिहिताना हार्डीच्या अ मॅथेमॅटिशिअन्स ॲपॉलॉजी (A Mathematician's Apology) या पुस्तकाचा आधार घेणे उपयोगी होईल. या पुस्तकाला दीर्घ फोरवर्ड किंवा प्रस्तावना प्रसिद्ध लेखक व हार्डीचे तरुण मित्र सी. पी. स्नो यांनी लिहिली आहे. स्वतः हार्डीनी आपल्या आत्मचरित्रस्वरूप पुस्तकात आपल्या जीवनाविषयी फारच थोडे लिहिले आहे. म्हणून त्या पुस्तकातून हार्डीच्या जीवनासंबंधी फार थोडी माहिती मिळते. पण पुस्तकातली ही उणीव सी. पी. स्नोंच्या दीर्घ प्रस्तावनेने भरून काढली आहे. हार्डींच्या जीवनाविषयी आवश्यक व उपयुक्त माहिती सी. पी. स्नो यांनी दिली आहे. हार्डी दीर्घायुषी होते, तर त्याचे शिष्य किंवा 'फ्राइंड' रामानुजन ३३ व्या वर्षीच वारले. हार्डीचा जन्म ७ फेब्रुवारी १८७७ चा व मृत्यू डिसेंबर १९४७ चा. म्हणजे त्यांना ७० वर्षांचे दीर्घायुष्य लाभले. रामानुजन यांचा जन्म २२ डिसेंबर १८८७ चा, तर मृत्यू २६ एप्रिल १९२० ला. त्यांना केवळ ३३ वर्षांचे आयुष्य मिळाले.

१९१९ साली हार्डी केंब्रिज विद्यापीठातून काही काळासाठी ऑक्सफर्ड विद्यापीठात नोकरीसाठी गेले. तिथले काम, सेवाशर्ती व वातावरण त्यांना अधिक चांगले आहे, असे वाटले. तिथला त्यांचा सेवाकाळ सुखाचा व शांततेचा गेला. काही काळ तिथे घालवल्यावर त्यांच्या लक्षात आले, की केंब्रिज विद्यापीठात निवृत्तीचे वय जास्त असते. मग १९३१ मध्ये ते परत केंब्रिजला आले व तिथेच उरलेल्या काळात ते आपले गणितातले काम करीत राहिले. हार्डीच्या पुस्तकाचे प्रस्तावनाकार स्नो सांगतात, की हार्डी स्वभावाने फार उमदे होते. कोठल्याही प्रकारची नैतिक ढोंगबाजी व उसना आव त्यांना आवडत नव्हता. सर्व प्रकारच्या यांत्रिक उपकरणांची त्यांना नावड होती. घड्याळ व फोन त्यांना आवडत नसे. आधुनिक यांत्रिक उपकरणांची नावड असतानाही हार्डी फार वक्तशीर होते. आपले सर्व व्यवहार ते वेळेवर करीत व भेटीसाठी ठरलेली वेळ ते नीट पाळत.

युद्ध त्यांना मनापासून आवडत नसे. दुसरे महायुद्ध सुरू झाले ही घटना त्यांना आवडली नाही. निराशेने त्यांना ग्रासले. त्याच वर्षी त्यांना हृदयरोगही जडला. त्यांचे नियमितपणे खेळणे पण थांबले. उच्च दर्जाचे गणित, सर्जनशील गणित तरुण वयातच करता येते हे अनेक गणितज्ञांप्रमाणे त्यांनाही माहीत होतेच. आता त्यांना ते अनुभवातून उमजत होते. त्यांच्या बहिणीने त्यांची शेवटच्या आजारात काळजी घेतली. तिने १९४७ साली सी. पी. स्नो यांना कळवले, की हार्डी फार आजारी आहेत व स्नो यांनी त्यांना नियमित भेटावे. दर आठवड्याला केंब्रिज येथे जाऊन स्नो हार्डीना भेटत असत. स्नो सांगतात, की अगदी लहानपणापासून आपण गणितज्ञ व्हायचे ही महत्त्वाकांक्षा हार्डीनी आपल्यासमोर ठेवली होती. आपल्या

वयाच्या १५ व्या वर्षी ॲलन ऑबिनचे (Alan Aubyn) 'अ फेलो ऑफ ट्रिनिटी' हे पुस्तक त्यांना फारच प्रभावित करून गेले. आपणही एक दिवशी ट्रिनिटी फेलो व्हावे, ही महत्त्वाकांक्षा त्यांच्या मनात तयार झाली. (गतायुष्याकडे पाहताना ऑबिनचे ते पुस्तक सामान्यच होते असे हार्डींना वाटत होते, असे स्नो सांगतात.)

केंबिजमध्ये हार्डी जेव्हा गणित शिकायला आले तेव्हा त्यांना समजले, की आपल्या शिक्षकांपेक्षा आपल्याला गणित अधिक चांगले येते. ट्रायपॉस मिळाल्यानंतर त्यांना शिकवणारे प्रभावी शिक्षक प्रा. लव (Professor Love) यांनी त्यांना जॉर्डन यांचे 'कोर्स द ॲनलीज' (cours d' analyse) पुस्तक वाचायला सांगितले. ते पुस्तक वाचल्यानंतर गणित म्हणजे काय याची नीट जाणीव हार्डींना झाली व गणितात प्रगत संशोधन करण्याची त्यांना प्रेरणा मिळाली. त्यानंतर १२ वर्षांनी १९११ मध्ये प्रा. लिटलवुड यांच्या जोडीने त्यांनी गणितातले जे संशोधन केले, त्यामुळे हार्डी यांना जागतिक कीर्तीचा गणिती अशी प्रसिद्धी मिळाली. लिटलवुडबरोबरील त्यांचे हे सहकार्य त्यानंतरही प्रदीर्घ काळ राहिले व ते सहकार्य दीर्घकाळ टिकण्याचे रहस्य कोणालाही समजले नाही. हार्डी व लिटलवुड या दोघांनीही त्या सहकार्यासंबंधी कधीच वाच्यता केली नाही. हार्डींना विद्यापीठात रुटीन व कंटाळवाणे काम कधीच करावे लागले नाही. कामाबाबत ते नशीबवानच होते. त्यांना सतत आवडीची, आव्हानात्मक व सर्जनशील कामे मिळाली. ज्या वर्गांना त्यांनी शिकवले, ते वर्ग गणितात रस घेणाऱ्या विद्यार्थ्यांचे होते; संशोधनासाठी त्यांच्याकडे आलेले विद्यार्थि-संशोधक हुशार होते; गणितातले संशोधन करण्यासाठी हार्डींना पुरेसा वेळ व संधी आपल्या व्यावसायिक कार्यकाळात मिळाली. आपण संशोधनासाठी गणिताची केलेली निवड व आपली मोठा गणिती व्हायची महत्त्वाकांक्षा सफल झाली, याचे समाधान त्यांना मिळाले. आपल्याला व्यवसाय म्हणून निम्न दर्जाचे गणित करावे लागले नाही, याचे तर त्यांना समाधानच वाटले. ते म्हणतात, "मी ज्ञानात काही भर घालू शकलो व काही जणांना ज्ञानात (म्हणजे गणिती ज्ञानसाठ्यात) भर घालायला मदत केली." (पा. १५१). आयुष्य व कार्य या संबंधातली ही कृतार्थता त्यांनी शब्दांतून व्यक्त केली आहे.

स्नो यांच्या प्रस्तावनेनंतर हार्डींनी आपल्या या पुस्तकात काय म्हटले आहे, हे पाहणे योग्य होईल. हार्डींनी स्वतःच्या आयुष्याविषयी फार थोडे या पुस्तकात लिहिले आहे. (ती उणीव स्नो यांच्या प्रस्तावनेने भरून काढली आहे, हे आपण पाहिले आहेच.)

हार्डींनी आयुष्याविषयी जी काही विधाने केली आहेत, ती आपण प्रथम पाहू. त्यांनी म्हटले आहे, की माणसाला जर काही कर्तृत्व करायचे असेल, तर त्याने गंभीरपणे आपले काम केले पाहिजे व त्यागासाठी तयार असले पाहिजे (पा. ६६-७०). काम कोठल्याही क्षेत्रातले असो, त्यामागचे हेतू तीन असतात असे हार्डींचे मत होते. १) बौद्धिक उत्सुकतेतून माणूस सत्याचा शोध घेऊ इच्छितो. २) व्यवसायासंबंधी अभिमानातून किंवा व्यवसायात यश मिळवावे या हेतूने माणूस प्रयत्न करतो. ३) महत्त्वाकांक्षा, कीर्ती, पद, सत्ता व पैसा मिळवण्याची इच्छा माणसाला प्रयत्न करायला उद्युक्त करते. हे तीन हेतू मानवी प्रयत्नामागे असू शकतात, असे त्यांचे मत आहे. त्यांना हे पण माहीत आहे, की टिकाऊ स्वरूपाचे काम थोडेच जण करीत असतात. (पा. ७१-७७) हार्डींची गणितासंबंधी काही मते होती व ती त्यांच्या प्रदीर्घ अनुभवावर आधारलेली होती. गणितज्ञ एखाद्या चित्रकारासारखा किंवा कवीसारखा असतो. तो कल्पनांचे वेगवेगळे आकार बनवत असतो. गणितज्ञाने बनविलेले कल्पनांचे आकार सुंदर व तालबद्ध असतात, असे हार्डींचे मत आहे. ते आकार कविकल्पनांपेक्षा अधिक काळ टिकतात, असे हार्डींना वाटते. (पा. ९१)

पूर्वसूरींचा विचार करत असताना त्यांनी प्रथम युक्लिड व पायथॅगोरस या पाश्चात्त्य परंपरेतल्या आद्य गणितज्ञांचा विचार केला आहे. युक्लिड व पायथॅगोरस हे गणितज्ञ होतेच; पण त्यांना इतर विषयांतही रस होता. पायथॅगोरसचा 'इररॅशनॅलिटी ऑफ प्राइम नंबर्स' चा सिद्धान्त आणि 'जनरॅलिटी सिद्धान्त' हे अनेक विषयांशी संबधित सिद्धान्त आहेत. प्रसिद्ध गणिती व्हाइटहेड स्पष्ट करतात, की निश्चितता किंवा सर्टन्टी ही कल्पना 'जनरल' या गणितातल्या कल्पनेवर आधारित आहे. २+३=५ हे गणितातले समीकरण निश्चित



अनुक्रमणिका

स्वरूपाचे म्हणजे आपल्याला दिसणाऱ्या सफरचंदाप्रमाणे स्पेसिफिक किंवा कॉन्क्रीट नसते (म्हणजे ते दाखवता येत नाही). २, ३, ५ या अमूर्त किंवा ॲब्स्ट्रॅट कल्पना आहेत व त्यांचे असणे हे परस्परसंबधांवर आधारलेले आहे. डेप्थ किंवा खोली ही अशीच संकल्पना आहे. कोणत्या गोष्टीशी तुलना केली तर एखादी गोष्ट खोल ठरते, हे महत्त्वाचे असते. खोली ही संकल्पना समूर्त नसून अमूर्त आहे.

हा मुद्दा स्पष्ट करण्यासाठी बुद्धिबळाचे उदाहरण हार्डींनी दिले आहे. पायथॅगोरस व युक्लिड 'इर्रॅशनॅलिटी ऑफ रूट्म ऑफ प्राइम' नंबर्स, व 'जनरॅलिटी'च्या सिद्धान्तात बुद्धिबळाच्या खेळाप्रमाणे मोठी अनपेक्षितता, अटळता व संक्षिप्तता आहे, असे हार्डींचे मत आहे. हार्डी म्हणतात, की गणितातल्या गोष्टी आकाशपुंजासारख्या साध्या, स्पष्ट, स्वच्छ असाव्या; आकाशगंगेप्रमाणे त्या धूसर नसाव्यात, अशी अपेक्षा आपण गणिताकडून करीत असतो (पा. ११३). ही तुलना करताना हार्डींना माहीत होते, की तुलना मर्यादित अर्थानेच केलेली आहे. बुद्धिबळ हा एक मनोवैज्ञानिक खेळ आहे. त्यात एक शिक्षित व बुद्धिमान खेळाडू दुसऱ्या शिक्षित व बुद्धिमान खेळाडूबरोबर खेळत असतो, स्पर्धा करीत असतो. असेच गणितात होत असते, एवढेच हार्डींना इथे अभिप्रेत आहे. गणितात सर्जनशीलता असल्यानेच हार्डींना गणित आवडे. उपयुक्ततेची कसोटी ते गणिताला लावत नाहीत. उपयुक्त व माणसाच्या सुखासमाधानात भर घालणारे गणित प्राथमिक स्वरूपाचे असते, असे हार्डींचे मत आहे. उपयुक्त असणारे गणित सौंदर्याची कसोटी पार करू शकत नाही, असे ते मानतात. महत्त्वाचे मानले जाणारे फेरमाट (fermat), ऑयलर (Euler) गॉस (Gaus), आबेल (Abel) आणि रीमन (Riemann) या प्रसिद्ध गणितज्ञांचे गणित उपयुक्त गणित नव्हतेच, हे हार्डी स्पष्ट करतात.

शुद्ध गणित व उपयोजित गणित ही दोन्ही प्रकारची गणिते सुंदर आहेत, असे हार्डी म्हणतात. उपयुक्त असलेले गणित माणसाला उपयोगी पडणाऱ्या शास्त्रांशी सरळ संबंधित असते, तर उपयुक्ततेशी संबंधित नसलेले गणित सौंदर्याशी संबंधित असते व ते काल्पनिक जगाशी संबंधित असते, असे हार्डी सांगतात (पा. १३५). शुद्ध गणित माणसाच्या सुखसमृद्धीत भर टाकीत नसेल, पण त्याचे असे सौंदर्य आहे. ज्ञानाच्या प्रांताशी ते निगडित आहे, असे ते म्हणतात. उपयुक्त गणित शाळकरी दर्जाचे व निम्न दर्जाचे असते, तर उच्च दर्जाचे व खरे गणित त्यापेक्षा फार वेगळे असते; त्याचे सौंदर्यच वेगळे असते; ते निष्पाप, निरुपद्रवी (हार्मलेस), नेटके (ऑस्टिअर) व सर्जनशील असते, असे हार्डींचे मत आहे (पा. १३९). उपयुक्तता व गणिती वास्तववाद या दोन परस्परांहून फार वेगळ्या गोष्टी आहेत, असे ते म्हणतात. हार्डी वास्तवाचे नैसर्गिक वास्तव व गणिती वास्तव असे दोन प्रकार मानतात. दिवस व रात्र, सूर्य व चंद्रग्रहणे, भूकंप, ज्वालामुखी अशी घटिते नैसर्गिक वास्तवात मोडतात; तर गणिती वास्तव वेगळे असते. गणिती वास्तव म्हणजे नेमके काय, याचे निश्चित उत्तर देणे गणितज्ञ व तत्त्वज्ञान्यांनाही कठीण आहे. ते अवघड उत्तर काही गणिती व अतिभौतिकीय तत्त्वज्ञ भविष्यात कधीतरी देऊ शकतील, असे हार्डींना वाटते (पा. १२३). आज ते देणे कठीण आहे. ते वास्तव नैसर्गिक वास्तवापेक्षा वेगळे आहे, एवढेच म्हणणे शक्य आहे. गणिती वास्तव भौतिक वास्तवापलीकडचे असते; ते वास्तव काय आहे हे शोधून काढणे, त्याचे निरीक्षण करणे हे गणितज्ञांचे काम आहे. गणितातले तज्ज्ञ जी गणिती प्रमेये व गणितातले सिद्धान्त मांडतात, ती आपलीच निर्मिती आहे असे त्यांना वाटत असते; खरे म्हणजे ती प्रमेये व सिद्धान्त गणिती वास्तवाचा भाग असतात; ती गणितज्ञांची निर्मिती नसते, असे हार्डींचे म्हणणे आहे. त्यांच्या मते गणिती वास्तवाच्या निरीक्षणाचे गणितज्ञाचे काम हे भौतिक शास्त्रज्ञाच्या भौतिकी वास्तव शोधण्याच्या कामापेक्षा अधिक मूल्यवान असते. गणितज्ञ वस्तूच्या संकल्पनेशी जोडलेला असतो, भौतिक वस्तूंशी तो जोडलेला नसतो. भौतिक वास्तवाची त्याला उपलब्ध असलेली कल्पना भौतिक वास्तवाशी तो ताडून पाहत असतो. त्या भौतिक वास्तवाचे घटक परस्परांशी कसे संबंधित आहेत, याचे कल्पनाचित्र तो बनवीत असतो व ते कल्पनाचित्र, वस्तूची ती रचना, तो आकृतिबंध त्याला गणितज्ञांकडून मिळत असतो. असे हार्डी म्हणतात (पा. १२९). आपल्या या

आत्मचरित्रात हार्डीनी स्वतःच्या गतायुष्याविषयी जसे फार थोडे लिहिले आहे, तसे रामानुजन या त्यांच्या सर्वांत गाजलेल्या 'फाइंड' विषयीही फार थोडे लिहिले आहे व ते त्यांच्या गाजावाजा न करण्याच्या स्वभावाला अनुसरूनच आहे.

**रामानुजन**

रामानुजन हे प्रसिद्ध गणिती म्हणून भारतीयांना माहीत आहेत. रामानुजन यांचा जन्म तमिळनाडूमधल्या इरोड येथे २२ डिसेंबर १८८७ रोजी झाला. त्यांचे कुटुंब अतिशय कर्मठ ब्राह्मणी पार्श्वभूमी असलेले कुटुंब होते. त्यामुळे त्यांचे बालपण त्याच प्रकारचे असणे स्वाभाविक होते. लहानपणी म्हणजे वयाच्या दहाव्या वर्षीच गणितातली त्यांची गती मोठी आहे, हे दिसले. त्यांची गणितातली गती पाहून लोनी (Loni) यांचे गणितावरचे पुस्तक त्या वर्षी त्यांना दिले गेले, ते त्यांनी १२ व्या वर्षी म्हणजे २ वर्षांतच आत्मसात केले. ही फार मोठी गोष्ट होती. महाविद्यालयीन शिक्षणासाठी ते कुंभकोणम येथे आले. त्यांचे गणितात लक्ष असल्याने इतर विषयांकडे त्यांचे फारसे लक्ष नसे, म्हणून त्यांना महाविद्यालयीन शिक्षणात अपयश सहन करावे लागले. कुटुंबाला आर्थिक मदत व्हावी म्हणून मद्रासमधल्या अकाउंटंट जनरलच्या कार्यालयात कारकून म्हणून त्यांनी नोकरी स्वीकारली. पण गणितातले त्यांचे काम सुरूच होते. मध्यंतरीच्या काळात त्यांचे जानकी या मुलीशी, त्या वेळच्या प्रथेप्रमाणे, लहान वयातच लग्न झाले होते. त्यांची कौटुंबिक जबाबदारी वाढलीच होती. १९१२-१३ ला केंब्रिज विद्यापीठातल्या ३ प्रसिद्ध गणितज्ञांकडे रामानुजननी आपल्या संशोधनाचे निबंध पाठवले होते. त्या ३ पैकी एक गणितज्ञ जी. एच. हार्डी यांनी त्यांचे संशोधन गंभीरपणे घेतले. हार्डी व त्यांचे सहकारी प्रा. लिटलवुड या दोघांनी रामानुजन यांनी पाठवलेले संशोधन नीट वाचले व हे एका प्रतिभावंत गणितज्ञाचे काम आहे हे जाणून त्यांना केंब्रिज विद्यापीठात बोलावण्याचा त्या दोघांनी निर्णय घेतला. रामानुजनना गणिताची साहजिक आवड आहे, त्यात त्यांची गती व प्रतिभा आहे, हे त्यांनी ओळखले होते. सी. पी. स्नो आपल्या 'फोरवर्ड' मध्ये म्हणतात, की हार्डी व रामानुजन यांचे संबंध फार हृदयस्पर्शी होते. रामानुजनमधला गणिती शोधणे, त्यांचे गणितातले काम पुढे नेण्यासाठी आवश्यक त्या सर्व गोष्टी करणे हे महत्त्वाचे काम हार्डींनी स्वतः प्रसिद्ध गणितज्ञ म्हणून केले. त्यामुळेच रामानुजन अगदी थोड्या काळात जगासमोर मोठे गणिती म्हणून पुढे आले. रामानुजन यांच्या कर्मठ पार्श्वभूमीमुळे त्यांनी परदेशी जायचे की नाही, हा पेच त्यांच्या घरी निर्माण झाला होता. सुदैवाने कुलदेवतेचा कौल मिळाला की, रामानुजन यांनी परदेशी जावे.

१७ मार्च १९१४ ला रामानुजन बोटीत बसून मद्रासहून इंग्लंडकडे निघाले. ते लंडनला १४ एप्रिलला पोचले. त्यांनी हार्डी व लिटलवुड यांच्या सहकार्याने गणितातल्या संशोधनाचे काम सुरू केले. गणिताचे फॉर्मल शिक्षण रामानुजनना मिळाले नव्हते. त्यांचा सारा भर स्वतःची गणितातली सहजगती, प्रतिभा, स्फूर्ती यांवर होता. पण आधुनिक गणितात लक्षवेधी काम करण्यासाठी या गोष्टी पुरेशा नव्हत्या, हार्डींनी आधुनिक गणितात प्रगती होण्यासाठी जरूरी असणाऱ्या सर्व गोष्टी रामानुजनना मिळतील, याची व्यवस्था केली. केंब्रिज युनिवर्सिटीच्या पदव्या व सन्मान मिळण्यासाठी ते लायक होतील, हे पाहिले. रामानुजन यांची कष्ट करण्याची तयारी होती व गणितात सहजगती तर त्यांना होतीच.

हार्डी व रामानुजन यांची व्यक्तिमत्त्वे फार वेगळी होती. हार्डींची पार्श्वभूमी, त्यांची संस्कृती, श्रद्धा, काम करण्याची पद्धती रामानुजनपेक्षा फार वेगळी होती. हार्डी कोठलाही धर्म मानणारे नव्हते, तर रामानुजन फार धार्मिक होते; ते शाकाहारी होते. हार्डींना गणिती काटेकोरपणा किंवा मॅथेमॅटिकल रिगर व गणिती पुरावे हवे असत, तर रामानुजन अंतःस्फूर्ती, प्रतिभा व दैवी प्रेरणा यांवर जास्त अवलंबून होते. देवी स्वप्नात येऊन नवे गणिती सिद्धान्त व नवी दृष्टी आपल्याला देते, असे त्यांना वाटत असे. पण हार्डींनी रामानुजनच्या या गोष्टी व श्रद्धा कधी मनावर घेतल्या नाहीत व त्यांच्या श्रद्धांना विरोध केला नाही. १९१६ साली रामानुजनना केंब्रिजची डॉक्टरेट (त्या वेळी त्या पदवीला बी. ए. म्हणत) मिळाली. १९१८ मध्ये रामानुजन फेलो ऑफ रॉयल सोसायटी बनले (तसे फेलो बनणारे ते दुसरे भारतीय होते). त्याच वर्षी ते केंब्रिज युनिवर्सिटीच्या ट्रिनिटी कॉलेजचे

फेलो झाले. तेव्हा त्यांचे वय ३० वर्षांचे होते. त्यांची तब्येत मात्र त्या वेळी बरी राहत नव्हती. शाकाहार, इंग्लंडमधली हवा व परदेशी असलेले वास्तव्य हे सगळेच घटक त्यांच्या अनारोग्याला कारणीभूत होते. त्यांना क्षयाची बाधा झाली आहे, असे निदान झाले व ते भारतात १९१९ ला परतले. १९२० ला त्यांचे तमिळनाडूमधल्या चेटपुट येथे निधन झाले. त्या वेळी ते ३३ वर्षांचेच होते. कमी वयातच ते गेले.

रामानूजन शांत स्वभावाचे होते, ते अतिशय उमद्या स्वभावाचे व काहीसे लाजाळू होते. हार्डींनी त्यांना बरोबरीच्या नात्याने वागवले, आपल्या गणितज्ञ म्हणून झालेल्या प्रगतीत प्रा. लिटलवुड व रामानुजन यांचा वाटा आहे, हे त्यांनी नोंदवले आहे (पा. १४८). त्या दोघांच्या सहकार्याचा त्यांनी अभिमानाने उल्लेख केला आहे.

आज हार्डी व रामानुजन हे दोघेही गणिताचा इतिहास जाणणाऱ्या अशा फारच थोड्या लोकांना माहीत आहेत. सर्वसामान्य बुद्धिवंताना त्यांचे नाव व कर्तृत्व माहित नाही. एक काळी बुद्धिवंतांच्या जगातल्या गाजलेल्या या गणितज्ञांचा परिचय सर्वसामान्य बुद्धिवंतांना असणे आवश्यक वाटते, कारण ज्ञानाचा इतिहास जपणे हे कोठल्याही देशाच्या सांस्कृतिक व बौद्धिक परंपरेच्या दृष्टीने आवश्यक व हितावह असते. अतिशय नम्रपणे आपली जीवनकहाणी सांगणारी व सत्याला न सोडणारी *ए मॅथेमॅटिशियन्स ॲपॉलॉजी* सारखी पुस्तके समाजाचे सांस्कृतिक व बौद्धिक भान जागृत ठेवण्यास मदत करतात.



# महाभारत ते सातवाहन ते विल्यम जोन्स

हरगोविंद म. होले

हिंदुस्थानाच्या प्राचीन इतिहासाचा शोध घेण्याचे काम ईस्ट इंडिया कंपनीच्या अधिकाऱ्यांनी १८ व्या शतकाच्या अखेरीस सुरू केले व १९ व्या शतकाच्या अखेरपर्यंत त्यांचा हा उद्योग चालू होता. हे काम करायचे तर संस्कृत, पाली, अर्धमागधी, प्राकृत यांसारख्या जुन्या भाषांची माहिती असणे आवश्यक होते. संस्कृत भाषा शिकायची, तर त्यासाठी इथल्या पंडितांची शिकवणी ठेवली पाहिजे. या पंडितांना संस्कृत भाषेची जरी उत्तम माहिती असली, तरी प्राचीन कालपटाची माहिती नव्हती. त्यामुळे या अधिकाऱ्यांनी अनुमानधपक्याने प्राचीन काळाचा कालपट (क्रोनॉलॉजी) तयार केला. या कालपटात अनेक घोटाळे निर्माण झाले. त्यांतील महत्त्वाची गफलत म्हणजे महाभारताचा काळ फारच पुढे ओढला गेला व तो इ. स. पू. १५०० च्या सुमाराला ठरवण्यात आला.

महाभारताचे युद्ध कलियुग सुरू झाले त्या सुमारास घडले, असे भारतीय ज्योतिषशास्त्र मानते. हा काळ इ. स. पू. ३१०१ किंवा ३१०२ असा ठरतो. तिथपासून युधिष्ठिरसंवत सुरू झाला. महाभारतात भारतीय युद्धाच्या काळची जी ग्रहस्थिती सांगितली आहे, त्यावरून गणित केले असताही महाभारताचा काळ इ. स. पू. ३१०२ वर्षे असाच येतो. भारतीय कालगणना ही युधिष्ठिर-संवतावर आधारलेली आहे.

पुराणांतील वंशावळींप्रमाणे सातवाहनांची सत्ता युधिष्ठिर शकाच्या २५५४ मध्ये संपली. हा काळ इसवी सनाच्या भाषेत इ. स. पू. ५४८ हा येतो. कुशाणांनी सातवाहनांचे राज्य बुडवले, असा पुराणांत उल्लेख आहे. कुशाणांचा पहिला सम्राट कनिष्क होता, असे काश्मिरचा इतिहास सांगतो. युधिष्ठिरसंवताच्या २६२२ या वर्षी तो काश्मिरचा राजा झाला. हा काळ इ. स. पू. ४८० असा येतो.

हिंदुस्थानावर पहिले आक्रमण सीरियन शक लोकांनी केले, असा पुराणांतरी उल्लेख आहे. तेव्हापासून हिंदुस्थानात सीरियन संवत चालू झाला. युगाब्द २५४४ मध्ये, म्हणजे इ. स. पू. ५५८ मध्ये सीरियन संवत म्हणजेच शक संवत किंवा प्रवर्थमान संवत याची गणना चालू होते. याला आधार रूडिपुरुषदत्त या शक क्षत्रपाच्या नागार्जुन कोंडा येथील शिलालेखाचा आहे. युगाब्द ३०४४ म्हणजे सीरियन संवत ५०० मध्ये अवंतीच्या विक्रमादित्याने विक्रम संवत प्रचारात आणला. हे वर्ष इ. स. पू. ५८ होय. विक्रमादित्याच्या नातवाचा नातू हर्षवर्धन याने युगाब्द ३१७९ (म्हणजेच इ. स. ७७) मध्ये शालिवाहन शक स्थापन केला. महाशिव गुप्त नावाचा राजा हर्षाच्या समकालीन होता. त्याने बोंडा येथील शिलालेखात म्हटले आहे की, सीरियन संवत ६२२ मध्ये (म्हणजे इ. स. ६४ मध्ये) मी हे दानपत्र देत आहे. याचा अर्थ असा की हर्षवर्धनाचा काळ इ. स. ७ वे शतक असा नसून पहिले शतक असा आहे.

विल्यम जोन्स व इतर इंग्रज इतिहासकारांनी सीरियन संवत- म्हणजेच प्रवर्थमान संवत-आणि ख्रिस्त संवत यांची गल्लत केली. हर्षाचा काळ सीरियन संवत ६३५ म्हणजेच ख्रिस्त संवत ७७ असताना त्यांनी तो इ. स. ६३५ असा धरला. म्हणजे त्यांनी हर्षाचा काळ ५५८ वर्षांनी अलीकडे ओढला. हाच गोंधळ त्यांनी गुप्त व मौर्य या घराण्यांच्या बाबतीत केला आहे. जो काळ गुप्तांचा, त्या काळात त्यांनी मौर्य राजे बसवले. कसे ते पाहू.

मेगॅस्थेनिस हा ग्रीक प्रवासी हिंदुस्थानात आला होता. त्याचे संपूर्ण प्रवासवर्णन उपलब्ध नाही. नंतरच्या ग्रंथकारांनी त्याच्या, एके काळी उपलब्ध असलेल्या, प्रवासवर्णनातून घेतलेले उतारे सापडतात. मेगॅस्थेनिस सांगतो की, महाभारत काळानंतर २७६० वर्षांनी, म्हणजे इ. स. पू. ३४२ या वर्षी, सँडोक्रॅट नावाचा राजा मगधावर राज्य करीत होता व तोपर्यंत जरासंधापासून १३८ राजांनी मगधावर राज्य केले होते. पुराणांतील








माहितीवरून या राजांची नावे काढली तर मेगॅस्थेनिसच्या काळी समुद्रगुप्त हा राजा येतो. पण विल्यम जोन्सने आपल्या लहरीनुसार सँडोस्क्रॅट म्हणजे चंद्रगुप्त मौर्य असे ठरवून टाकले. खरेतर समुद्रगुप्त म्हणजे सॅडोस्क्रॅट होय.

चंद्रगुप्त मौर्याचा नातू अशोक मौर्य. त्याने आपली मुलगी संघमित्रा ही कलिंग देशाच्या राजाला दिली होतो. त्यामुळे अशोक मौर्याने कलिंगावर स्वारी करण्याचे कारणच नव्हते. अशोक मौर्याच्या काळी 'देवानाम् तिस्स' नावाचा राजा सिलोन (आताचा श्रीलंका) देशावर राज्य करीत होता. 'अशोक मौर्य' व 'देवानाम् तिस्स' हे दोघेही बौद्ध झाले. चंद्रगुप्त या गुप्तवंशीय राजाचा नातू दुसरा चंद्रगुप्त (विक्रमादित्य) हा अशोक मौर्य व देवानाम तिस्स या दोन्ही बौद्ध राजांचा चाहता होता. तो स्वतःला 'अशोकस्' म्हणवून घेत असे. या विक्रमादित्याने कलिंगावर स्वारी केली होती व त्यातील प्राणहानीमुळे पश्चात्ताप होऊन त्याने बौद्ध धर्म स्वीकारला. गुप्तांच्या काळी वाकाटकांची सत्ता महाराष्ट्र, विदर्भ, मध्यप्रदेश या भागांत होती. विक्रमादित्याने आपली मुलगी प्रभावती ही वाकाटक राजाला दिली होती. तिची मुलगी धामादेवी हिचा शिलालेख कार्ल्याचा लेखात आहे. त्यात ती स्वतःला अशोकस् राजाची नात म्हणवते. हा अशोकस् अशोक मौर्य असू शकतो का?

पुराणांप्रमाणे महाभारत युद्धानंतर युधिष्ठिराने ३६ वर्षे राज्य केले. नंतर परीक्षितापासून मगधवंशातील अरिंजयापर्यंत २२ राजांनी १००० वर्षे राज्य केले. त्यामागून काश्यपवंश (१३२ वर्षे), प्रद्योत वंश (१३८ वर्षे), शिशुनागवंश (३६२ वर्षे), नंदवंश (१०० वर्षे), मौर्यवंश (१७३वर्षे), शुंगवंश (११२ वर्षे), काण्ववंश (४५वर्षे) व सातवाहनवंश (४५६ वर्षे) अशी १५१८ वर्षे गेली. म्हणजेच युधिष्ठिर संवताची १५१८+१०००+३६=२५५४वर्षे लोटली. या काळात १२८ राजांचा राज्यकाळ झाला.

बृहत्संहिताकार वराहमिहीर याने सांगितले आहे की, युधिष्ठिर संवताच्या २५५४ वर्षांनंतर सीरियन (म्हणजेच शक) राजांची सत्ता चालू होईल. आपण पाहिलेच आहे की, रूडिपुरुषदत्त ह्या शक-क्षत्रपाने आपल्या शिलालेखात सीरियन संवताचा उल्लेख केला असून तेव्हा सीरियन संवत ११ होता, असे म्हटले आहे. युधिष्ठिर संवत २५५४ मध्ये सीरियन सत्ता आली व तेव्हा (वरील शिलालेखाप्रमाणे) सीरियन संवत ११ होता असे धरले, तर युधिष्ठिर संवत २५४४ पासून सीरियन संवताची गणना सुरू होते, असे म्हणावे लागेल. हा काळ इ. स. पू. ५४८ वर्षे असा येतो.

सातवाहन राजवटीचा शेवट शकांनी केला. शकांचे आक्रमण हे हिंदुस्थावर झालेले पहिले परकीय आक्रमण होय. यानंतर शक राजे व त्यांचे मांडलिक असलेले गुप्तराजे यांनी २५५५ ते २७६० (युधिष्ठिर संवत) अशी २०५ वर्षे राज्य केले. युधिष्ठिर संवत २७६० म्हणजे इ. स. पू. ३४२ वर्षे. या वर्षी चंद्रगुप्ताचा मुलगा समुद्रगुप्त गादीवर आला. याला आधार शक-क्षत्रप श्रीधरवर्मा याच्या प्रयाग येथील शिलालेखाचा आहे. त्यात श्रीधरवर्मा म्हणतो की, त्याने हा शिलालेख समुद्रगुप्ताच्या आज्ञेने लिहिला. आपण पाहिले आहे की, मेगॅस्थिनीस युधिष्ठिर संवत २७६० मध्ये सॅडोस्क्रॅट राजा मगधावर राज्य करीत होता, असे सांगतो. भारतीय कालगणनेनुसार हा राजा समुद्रगुप्त होता (चंद्रगुप्त मौर्य नव्हे) हे स्पष्ट होते. युधिष्ठिरापासून मगधाच्या राजांची जी यादी दिली आहे, तिच्यानुसार चंद्रगुप्त मौर्य युधिष्ठिर संवत १७६८ मध्ये म्हणजे समुद्रगुप्ताच्या पूर्वी ९९२ वर्षे होऊन गेला होता. मेगॅस्थिनिसच्या सँडोस्क्रॅटचे चंद्रगुप्त मौर्याशी समीकरण लावून विल्यम जोन्सने भारतीय इतिहासातील ९९२ वर्षे गिळून टाकली!

चंद्रगुप्त विक्रमादित्य याने बौद्ध धर्माचा स्वीकार केला. त्याने 'आपण अशोक (मौर्य) राजाप्रमाणे प्रजेची सेवा केली', असे स्वतःच्या शिलालेखात म्हटले आहे. मेगॅस्थेनिसने त्याचा उल्लेख 'Rex Parkarjum अशोकस्' असा केला आहे. यानेच सेल्युकस निकेटरचा पाडाव केला. त्याच्या राज्यकाळात बौद्ध धर्मात २८ उपपंथ होते. अशोक (मौर्य) याच्या काळात बौद्धांत हीनयान व महायान असे दोनच उपपंथ होते. अशोकस् म्हणजे अशोकाच्या आदर्शानुरूप काम करणाऱ्या राजाचा शिलालेख सीरियन संवत २५६ चा म्हणजे युधिष्ठिर शक २८०० किंवा इ. स. पू. ३०२ आहे. याच

शिलालेखात चोल, पांडव व सातवाहन यांचेही उल्लेख आहेत. अशोक (मौर्य) याच्या काळी या वंशाची राज्येच नव्हती.

'राजतरंगिणी' च्या दुसऱ्या तरंगात काश्मिरच्या युधिष्ठिरसंवत २९५८ (इ. स. पू. १४४) पासून युधिष्ठिरसंवत ३१५० (इ. स. ४८) पर्यंतच्या १९२ वर्षांचा इतिहास दिला आहे. त्यात काश्मिरबाहेरच्या प्रदेशांच्या समकालीन इतिहासाचे उल्लेखही येतात. त्यावरून पुढील गोष्टी कळतात-मगधावरील गुप्तांची सत्ता युधिष्ठिरसंवत २८९८ (इ. स. पू. २०२) मध्ये संपुष्टात आली. गुप्तांचे मगधावर राज्य असतानाच त्यांच्या राज्यातील 'अवंती' हा प्रदेश यशोवर्मन नावाच्या राजाने युधिष्ठिरसंवत २८७३ (इ. स. पू. २२९) मध्ये जिंकून घेतला होता. युधिष्ठिरसंवत २८९८ पासून युधिष्ठिरसंवत ३१९८ पर्यंत यशोवर्मनच्या वंशाने अवंतीवर राज्य केले. त्या वंशात विष्णुवर्मन, अवंतीवर्मन, बंधुवर्मन् (म्हणजेच विक्रमादित्य २ रा), शिवदित्य, प्रभाकरवर्धन, राज्यवर्धन व हर्षवर्धन हे राजे झाले.

विक्रमादित्य (२ रा) याने अवंतीवर स्वारी करून आलेल्या शकांचा पाडाव युधिष्ठिरसंवत ३०१० (इ. स. पू. ९२) या वर्षी केला. व त्यानेच आपला संवत युधिष्ठिरसंवत ३०४४ (इ. स. पू. ५८) मध्ये सुरू केला. याच्या दरबारात कालिदास हा महाकवी होता. विक्रमादित्य (२ रा) याचा काश्मिरातील समकालीन राजा प्रवरसेन (१ ला) हा होता. त्याच्या पदरी चंपक नावाचा मोठा कवी होता.

काश्मिरच्या इतिहासातील कुशाण व हूण यांच्या कारकिर्दीवरून दिसून येते की, भारतात अलेक्झांडरच्या काळी मौर्यांचे राज्य नसून गुप्तांचेच राज्य होते. पुराणांतील वंशावळींचा हिशेब केला तर महाभारतापासून युधिष्ठिरसंवत् २७६० (इ. स. पू. ३४८२) पर्यंत-म्हणजेच समुद्रगुप्तापर्यंत १३८ पिढ्या बरोबर दिसून येतात. सारांश, विल्यम जोन्स याने सँडोस्क्रॅट = चंद्रगुप्त मौर्य हे समीकरण बसवून मोठी चूक केली व भारताच्या प्राचीन कालपटात घोटाळा निर्माण केला.



अनुक्रमणिका

पुस्तक परीक्षण

## 'अंधाराचा गाव माझा' - कृषिवलांच्या उद्‌ध्वस्ततेची कविता

पंडितराव पवार

१९९० नंतरच्या मराठी कवितेने आपला चेहरा-मोहरा आशय-अभिव्यक्तीच्या दृष्टीने खूपच बदलला आहे. सुरुवातीची ग्रामीण कविता बरीचशी कल्पनाप्रचुर आणि रोमॅन्टिक होती. १९६० नंतर हळूहळू एकूणच ग्रामीण साहित्याची चळवळ उदयास आल्यावर मराठी ग्रामीण कविता ग्रामीण जीवनाच्या अस्सल रंगरूपासह व्यक्त होऊ लागली. ग्रामीण भागातील शिक्षणाचा प्रसार, ग्रामीण भागातील सुशिक्षित तरुणांची समृद्ध होऊ लागलेली वाङ्‌मयीन अभिरुची, शहरी भागाबरोबरच ग्रामीण भागातून वाढलेला वाचकवर्ग, शहरात सुस्थिर झालेला ग्रामीण भागातील सुशिक्षितवर्ग आणि अशा नव्याने लिहिल्या जाणाऱ्या साहित्याला प्रकाशात आणणारा नव्या दृष्टीचा प्रकाशकवर्ग इत्यादी कारणांमुळे सर्व प्रकारच्या ग्रामीण साहित्यासह मराठी कविता विपुल प्रमाणात प्रकाशित होऊ लागली. समीक्षकांनी या कवितेला दाद दिली. विद्यापीठीय अभ्यासक्रमात प्रातिनिधिक स्वरूपात ही कविता समाविष्ट होऊ लागली. जुनी वृत्त-छंद यांच्या चौकटीतून बाहेर पडून मुक्तछंद पचवून मुक्तशैलीत ही कविता भावना आणि विचार यांच्या संयोगातून दमदारपणे व्यक्त झाली. या कवितेचा प्रमुख विशेष म्हणजे ही कविता लिहिणारा कवी हा ग्रामीण जीवन जगलेला असल्याने ग्रामीण परिसर, शेतकरी, त्यांच्या व्यथा आणि परंपरा यांचे जवळून अनुभव घेणारा आहे. त्यामुळे ग्रामीण जीवन आणि तेथील माती रूपरंगासह तो स्वानुभवातून व्यक्त करू लागला. त्यामुळे या कवितेला मृद्‌गंधाबरोबरच घामाच्या, जनावरांच्या शेणामुताच्या वासांची जोड मिळाली. कविता त्यामुळे अधिकच वास्तव रूपात समोर आली.

१९९० नंतरची ग्रामीण कविता समृद्ध करणाऱ्या अनेक प्रतिभावंत कवींत श्री. कैलास दौंड यांचेही श्रेय मोलाचे आहे. या कवितेच्या प्रवाहात त्यांची स्वतंत्र नाममुद्रा लक्षणीय आहे. यापूर्वी त्यांचे 'ऊसाची कविता', 'वसाण', 'भोग सरू दे उन्हाचा' या संग्रहानंतरचा 'अंधाराचा गाव माझा' हा चौथा कवितासंग्रह. वरील कवितासंग्रहांची शीर्षकेदेखील गावशिवाला त्याच्या व्यथा-वेदनांसह बोलकी करणारी जाणवतात. श्री. दौंड स्वतः शिक्षक असल्याने समाजात सतत वावरताना त्यांची निरीक्षणशक्ती सामान्य माणसांच्या व्यथा पाहताना अधिक संवेदनशील झालेली दिसते.

१९९१-९२ नंतर जागतिकीकरणाची, उदारीकरणाची आणि खाजगीकरणाची प्रक्रिया जागतिक पातळीवर सुरू झालेली दिसते. प्रगत राष्ट्रांत ही प्रक्रिया यापूर्वीच सुरू झालेली आहे. प्रत्येक विकसित राष्ट्र महासत्तेकडे वाटचाल करते झाले. त्यासाठी प्रचंड स्पर्धा सर्वत्र दिसून लागली. या जागतिकीकरणाच्या प्रक्रियेत विविध प्रगत देशांनी व्यापारासाठी एकमेकांना जोडून घेण्याची प्रक्रिया सुरू केली. त्यात खुलेपणाला वाव मिळाला. अर्थातच भांडवलदारांचा या जागतिकीकरणास छुपा पाठिंबा होताच. 'गॅट' कराराने ही मुभा आणि मर्यादाही जागतिकीकरणाचा एक भाग झाला. या जागतिकीकरणाचा परिणाम व्यापाराबरोबरच शेती, पर्यटन, शिक्षण इत्यादी अनेक क्षेत्रांवर उघडपणे झाला. त्याचा अपरिहार्य परिणाम त्या त्या क्षेत्राशी निगडित सामान्य माणसांवरही ठळकपणे जाणवू लागला. या जागतिकीकरणाचा हेतू त्या देशांच्या प्रगतीचा असला, तरी राजकीय पक्ष, भांडवलदार, परराष्ट्रीय धोरण यांमुळे तो 'बळी तो कान पिळी' न्यायाने सामान्यांच्या अधोगतीकडे जाणारा ठरू लागला. जो शक्तिवान तोच या जागतिकीकरणातील महास्पर्धेत टिकेल, ही वस्तुस्थिती समोर येऊ लागली, हे कटुसत्य आहे. ग्रामीण भाग ओस पडून वाढत्या शहरीकरणाला गती मिळू लागली.

शेतकऱ्यांच्या नशिबी असलेले दारिद्र्य, निसर्गावर आधारित जीवन, अंधश्रद्धा, शेतकऱ्यांच्या आत्महत्या इत्यादी घटकांप्रमाणेच राजकारण आणि जागतिकीकरण,

अनुक्रमणिका

त्यासाठी आलेले 'सेझ'चे धोरण हेही कसे कृषिवलांचे जीवन उद्ध्वस्त करीत आहे, याचा वास्तव आविष्कार 'अंधाराचा गाव माझा' या कवितासंग्रहात पानोपानी प्रत्ययास येतो. त्याचप्रमाणे यापूर्वीची समृद्ध शेती आणि पावसाचे नर्तन यांचेही अपवादात्मक दर्शन येथे घडते.

'पावसाने शेतातले। उभे पीक नेले
बाजारात विकायचे । भाव ढासळले.' (पृ. २१)

कसेतरी कष्टाने पीक उभे केले ते अवकाळी पाऊस उद्ध्वस्त करतो. उरलेले बाजारात व्यापारी कवडीमोलाने घेतो. ज्याच्या अंगाअंगात 'मातीचा वास' भिनला आहे, त्या कृषिवलाला व्यवस्थेने लुबाडून 'खोल मातीत' दडपून टाकले आहे. त्यामुळे तो पुन्हा वर डोकेच काढू शकत नाही. दुसरीकडे बाजारात त्याला मिळणाऱ्या वस्तूंचा भाव तो ठरवू शकत नाही. फक्त राजकारणी, मंत्री 'सुगी' दिसू लागल्यावर महागाई घालविण्याची भाषा करतात. वास्तविक कृषिवलांच्या जिवावर उभ्या असणाऱ्या या कृषिप्रधान देशात हा कृषिवल मात्र देशोधडीला लागला आहे. तो प्रसिद्धिविन्मुख असल्याने कवी उपहासाने म्हणतो,

"तरी शेतकऱ्यांनो तुम्ही।
ठिगळाठिगळाचे का होईना
पण घातलेच पाहिजे।
अंगभर कापड
कारण तुम्हाला मरणोपरांत प्रसिद्धी नाही
तुमच्या अंगावरचा घाम पाहण्याची
तमाम दुनियेत औकात नाही." (पृ. २२)

साऱ्या जगाचे भरणपोषण करणारा शेतकरी कसा जगतो आणि का आत्महत्याग्रस्त होतो, हे पाहण्याला कुणाला वेळच नाही. किंबहुना कुणाची 'औकात' नाही, हे उघडे सत्य कवी सांगतो. तरीही हा कवी नैराश्यातील अंधारात जगणाऱ्या शेतकऱ्यांना संयम राखून 'जीव जगव रानाचा। गड्या नको आत्महत्या' असा सबुरीचा सल्ला देतो. परंतु या कर्जबाजारी शेतकऱ्यांच्या आत्महत्या थांबत नाहीत. पोराबाळांच्या कपड्यालत्त्यांची हौस बाजूला ठेवून तो महागडे बियाणे घेतो, पण ते बियाणेच खोटे ठरते. बँका-सोसायट्यांत त्याला आता पीककर्ज मिळत नाही. खाजगी सावकारी तो जवळ करतो आणि त्याच्या कर्जाचे 'डोंगर' मग एकावर एक चढतात. परिणामी त्याला आपला देह झुकवावाच लागतो. पण व्यवस्थेला 'त्यांचे सोयरसुतक नाही'. तिकडे राज्यकर्त्यांचेही लक्ष जात नाही. त्यासाठी काही अर्थतज्ज्ञांचे अभ्यासगट नेमले जातात. तेही उपहासाने सांगताना कवी लिहितो,

"शेतकऱ्यांच्या आत्महत्येने म्हणे।
राज्याची अब्रू जाते
म्हणून त्यांनी सिद्ध केले।
जे मेले ते शेतकरीच कुठे होते?" (पृ. २६)

तज्ज्ञांच्या अहवालांतून आत्महत्याग्रस्त शेतकरी गायब होतात. आणि राज्यात-देशात ज्या आत्महत्या होतात त्यांमागे व्यसनाधीनता, प्रतिष्ठेसाठी केलेला खर्च इत्यादी कारणे असल्याचे निष्कर्ष बाहेर येतात. यातून अर्थतज्ज्ञांची, राज्यकर्त्यांच्या बोटचेपेपणाची भूमिकाच स्पष्ट होते.

पाऊस सतत हुलकावणी देतो आणि कृषिवलाच्या वेदनेचा पान्हा टचटचून फुटतो. 'पिकांनी लाजून झुकविल्या माना। व्यवस्थेचे तण आले कापणीला' – लुबाडणाऱ्या स्वार्थी आणि उन्मत्त व्यवस्थेचे तणच आता कापण्याची वेळ आली आहे, ही कवीची चीड अत्यंत पोटतिडकीने व्यक्त होते. म्हणूनच तो पुन्हा म्हणतो,

"मी वाट पाहतो पिकाला।
धारदार कणसे येण्याची
अन् सम्राटाला तप्त आगीचा।
हुरडा खाऊ घालण्याची." (पृ. ३१)

शेतकरीजीवनाचा आत्मप्रत्यय असणाऱ्या या कवीची सम्राटाला तप्त आगीची शिक्षा देण्याची प्रतिक्रिया उपरी नाही. दुष्काळात होरपळण्याची, कर्जबाजारीपणाची, आत्महत्याग्रस्त शेतकऱ्यांची आणि त्यातून आशावादाने उभारी धरणारी असंख्य शब्दचित्रे या कवितांत आहेत. कधी देवावर भरवसा ठेवून पावसाला आळवणी केली जाते, तर कधी आलेला दुष्काळ झेलून,

"अशा ओसाड रानाला।
मन मारितसे हाका
दे रे पुढच्या वेळेला।
साथ कुणब्याच्या लेका." (पृ. ३४)

पण आशावादी बेभरवशाचाच असतो, हेही त्याला माहीत आहे. तरीही हा कृषिवल आपल्या रानातून अमृताचा

गंध हुंगू पाहतो आणि सर्वांच्या घरादारांत 'दिवा दिवाळीचा जळो' ही विश्वकल्याणाची प्रार्थना सृष्टिदेवाकडे 'बळिराजा'च्या त्यागमय भूमिकेतून करतो. कारण 'जीवासाठीच जीव आहे झुरणीला' ही त्याची सहानुभूती आहे.

या कृषिवलाला 'विशेष आर्थिक क्षेत्र' (सेझ) अंतर्गत होणाऱ्या विकासाची आणि त्यासाठी आपली जमीन गिळंकृत केली जाणार असल्याची चाहूल लागली आहे. वाढत्या शहरीकरणाची आणि मॉल संस्कृतीची चर्चा खेड्याच्या पारापर्यंत येऊन पोचली आहे. तरीही तो दुःखाचे बेगडी अस्तर घालून उसनी सुखे अनुभवतो. फाटका गंजीफ्रॉक घातलेला कष्टकरी म्हातारा आशेने 'मुळांना आलेलं उघडेपण' व्यर्थ झाकत असतो. पुढे त्याला खुरट्या पळ्हाट्यांची रोपटी दिसत असूनही त्याचे दोनही हात मातीत एकजीव झाले आहेत. त्याला आता त्याच्याच 'अस्तित्वाची काळजी' वाटते. आणि शेतांनीही वांझ ठरवून 'सेझवायला' मोकळे व्हावे अशा व्यथेत त्याची रापलेली बोटे खोटेखोटे सुख शोधू पाहतात. कष्टकऱ्याचे देशोधडीला लागणे म्हणजे काय, ते येथे कवीने अत्यंत सूचकतेने सांगितले आहे.

या 'ग्लोबल'च्या जमान्यात प्रत्येकाची महासत्तेत सहभागी होण्याची स्पर्धा लागलेली आहे. जो तो पुढे पळतो आहे. त्यासाठी बेफाम गर्दी आहे.

"महासत्तेच्या माजाचे वाजत राहतात हॉर्नबिर्न।
फुटपाथावर दुकानाशेजारी
कडेवर बसून चिमुरडं।
निरागसतेला पारखत शोधतेय
महाजालात आपले बालपण।
तासाभराची कोंडी
मग प्रत्येकालाच मार्ग मोकळा." (पृ. ५२)

महासत्तेचा माज, कडेवरील चिमुरड्या मुलाची हरवलेली निरागसता आणि त्याचे हरवलेले बालपण ही दृश्ये, जागतिकीकरणाने माणसांचे केलेले वस्तूकरण सहजपणे ध्यानी यावे. आता शेतकरीही दुष्काळामुळे शेती विकायचा विचार करून जागतिकीकरणात सहभागी होऊ पाहतो.

"उद्या तुझ्या दारामधी।
नवा धनिक येईल
सोन्यावाणी मोल तुला।
मायभूमीचे देईल." (पृ. ५३)

हीसुद्धा जागतिकीकरणातील शहरीकरणातून शेतकऱ्याला मिळणारी लालूच आहे. शेतातील अल्प उत्पन्नापेक्षा एकत्रित मिळणारी रक्कम त्याला जास्त महत्त्वाची वाटते, हाच अर्थ सूचित होतो.

जमीन घेणारा मालक या शेतकऱ्यास काम देईलच, याचीही हमी नाही. त्याला आणि पुढच्या पिढीलाही देशांतर केल्याखेरीज दुसरा मार्ग नाही. कवीच्या शब्दांतील,

'घेऊ नका। आणाभाका।
कंपन्यांना। जमीन विका
पोटामंदी। भंगार भरा।
पुढची पिढी। देशांतरा.' (पृ. ५५)

'विठूराया बळी। मीही बळीदास।
आवळीला फास। 'सेझ' योगे.' (पृ. ५३)

'माझ्या गावच्या माथ्यावं।
फिरतसे पवनचक्की
आणि गावातील वीज।
मिळे शहरासी नक्की.' (पृ. ५७)

'असा कसा होतो विकास?
ही कुठली महासत्ता?
अवघे-अवघे भूमिपुत्र।
होताहेत बेपत्ता.' (पृ. ६०)

'चल विकून टाक शेती।
ते कार्पोरेटवाले खूप भाव देतील
आता कुणीही तुझी शेती।
ओढून नेऊ शकतं बाळ
तू हो म्हण की नाही म्हण.' (पृ. ६२)

'वामनाच्या पायाखाली।
बळी मातीला पुजतो
जगताच्या भल्यासाठी।
बळी मातीत सजतो.' (पृ. ७८)

'वामनाच्या काफिल्याला।
धरा विनविते आज
कुणब्याच्या शेतावरी।
नका उभारू हो 'सेझ.' (पृ. ८०)

'पहिल्या पायात आम्ही पायातळी।
मग 'सेझ'तळी दिली भूमी.' (पृ. ३८)

वरील काव्यपंक्तींतून वाढते शहरीकरण, नवीन धरणे, रस्त्यांचे रुंदीकरण यांसारख्या विकासाच्या योजना महासत्तेच्या स्पर्धेतून येत असल्या, तरी बळीराजा मात्र व्यवस्था आणि शासन यांच्या भाराखाली दाबला जातो आहे. त्याची पुढची पिढी देशांतराला जाण्यास वेळ लागणार नाही. एकदा शेतकऱ्याची जमीन धनदांडगे आणि कार्पोरेटवाल्यांनी घशात घातल्यावर त्या शेतकऱ्यास बांधावर उभे राहण्याचाही अधिकार राहणार नाही. तो देशोधडीला लागल्यावर त्याला लाचारीने जीवन जगावे लागेल. परिणामी जागतिकीकरणाच्या या स्पर्धेत बळीराजा उद्ध्वस्त होणार आहे, हे कटुसत्य आहे. 'सेझ' हा या कवितेचा कळीचा विषय आहे. 'बळिराजा'च्या मिथकातून व्यवस्था त्याला जमिनीत कायमची गाडणार आहे, ही कवीची धारणा खरीच आहे.

स्वार्थी राजकारण, ढोंगी समाजसेवा, अंधश्रद्धा, स्त्रीवर्गाची पिळवणूक, भटक्या तांडेकऱ्यांचे बेभरवशाचे कर्जबाजारी आणि व्यसनी जीवन यांसारख्या समाज कुरतडणाऱ्या प्रश्नांनाही कवीने आपल्या कवितेत डोळसपणे स्थान दिलेले आहे. त्यामुळे गावाचे उद्ध्वस्तीकरण किंवा तांडेकरांचे जीवन हे एका विशिष्ट स्थितिगतीचे चित्रण नाही, तर एकूणच ग्रामजीवनातील समग्र व्यथांचे दिग्दर्शन करणारे आहे. 'शकून', 'पोटऱ्यातली ज्वार', 'शेत चालले उडून' या कवितांतील अंधश्रद्धा आणि कवीचे 'सालोसाल म्हसुबाला। शेंदराने माखलेस। लबाडाने वावराला। बघ नाही राखलेच' हे बोल डोळ्यांत अंजन घालणारे आहेत.

'गुंड मातले माजले डोक्यावरती चढले
कुऱ्हाडीच्या पात्यापरी गाव
रक्तात मढले.' (पृ. ६३)
'कालपरवाच तर झाला होता इथे
उष्टा-खरकटा भात मागणाऱ्या
पारध्याच्या मुलीवर...शाही बलात्कार...
या हसणाऱ्या मुली पाहून।
उडतोय जीवाचा थरकाप.' (पृ. ६७)
'येथे भाडेकरू, वाजविती टाळ।
विठ्ठलाशी नाळ, कोठे त्यांची.' (पृ. ७६)
'गावाहूनी गाडी येते।
मतदाना नेण्यासाठी...........
फुकटात गावी जा या।
शंभराची नोट वर.' (पृ. ९६)

या पंक्तींतील गावगुंडी, निरपराध आणि लाचार मुलींवरील बलात्कार, ढोंगी भक्तिभाव आणि स्वार्थी राजकारण नेमक्या शब्दांत व्यक्त झाले आहे.

निराधार वृद्ध स्त्री-पुरुषांची अवस्था आज अतिशय केविलवाणी आहे. तरुण पिढीला त्यांची आता गरज राहिलेली नाही. अशाच समाजातील दोन म्हाताऱ्या स्त्रियांची शारीरिक-मानसिक दुखणी कवी संवेदनशीलतेने व्यक्त करताना म्हणतो, 'मुलं पाहत नाहीत आपल्याकडे' आणि 'आपला तर बाई जन्म असाच गेला' हे अंत:करण हेलावणारे त्या स्त्रियांचे उद्गार समाजाचा तळ ढवळून काढणारे आहेत. सासरी होणारा छळ सहन करणाऱ्या सासुरवाशिणी मूकपणे सर्वकाही सहन करतात. 'कुठं खोलावं काळीज? कुठं घागर ओंतावी?' घागरभर साठविलेले दु:ख कोठे सांडले, तर आईबापांच्या जिवाला त्याचे किती दु:ख होईल, याचेही भान या सासुरवाशिणीला आहे. शेवटी सीतेचा आदर्श समोर ठेवून त्या जीवनाची वाटचाल करतात. संत जनाबाईच्या रूपाने ही स्त्री विठ्ठलाच्या आधाराने 'दळण कांडण। गोवऱ्या धुंडणं। राब राबुनिया। दासीचे मरण' हसत स्वीकारते. जनीने हसत दासीपण स्वीकारले होते, पण हिला मात्र टक लावून विठ्ठलाची वाट आधारासाठी पहावी लागते

'माणसे तांड्यातली' या अकरा खंडांच्या दीर्घ कवितेत भटक्या समाजाचे कष्टमय आणि परिस्थितिशरण जीवन अत्यंत साध्या शब्दांत उभे केले आहे. त्यांचे दैनंदिन जीवन, लाचारी आणि त्यातून आलेली व्यसनाधीनता कार्यकारणभावाने मांडली आहे.

'तांड्यातील माणसेही।
कामामधी झिंगलेली.' (पृ. ८२)
तांडा दारिद्र्याची खाण।
तांडा कष्टावया रान
तांडा उत्सव उरूस।
तांडा माळरानी जान (पृ. ८४)





या प्रातिनिधिक काव्यपंक्तींतून तांड्यातील माणसे आणि त्यांचे समग्र जीवन उभे राहते. ही तांड्यातील माणसे म्हणजे समाजाचाच एक भाग आहेत. ती एका विशिष्ट तांड्याचे प्रतिनिधी नसून समाजातील समग्र भटक्यांचे, त्यांच्या दारिद्र्याचे आणि त्यातच गावकुसाबाहेर, माळरानावर आपले जीवन खपविणाऱ्यांचे विदारक दर्शन आहे.

ग्रामजीवनाच्या अंधारात झाकोळल्या जीवनाचे वास्तव दर्शन घडविणारी आणि व्यथित मनाचे रंग प्रकटणारी ही कविता असली, तरी हा कवी मात्र अजूनही गावाला, शेतकऱ्यांना आणि स्वतःलाही उभारी देऊन आशावाद जागवितो.

आजवर व्यवस्थेने बळीला सर्व बाजूंनी लुबाडले असले, तरी 'कुणब्यांनो, आता जाळू जळमटांचे मढे' हा त्वेष व्यक्त होतो. हा त्वेष पुढे आशावाद वाढवितो.

'काठी नको, नको आग।
नको बॉम्ब, नको काडी
त्वचेआतल्या रक्ताच्या।
पेटव गड्या एकदा लडी.' (पृ. ५१)

हा सात्त्विक सल्ला बळिराजाच्या हिताचा आहे. त्यातून तो किमान आत्महत्येपासून तरी दूर व्हावा. 'घराच्या दारात। भरू दे उरूस' ही समाजकल्याणाची भावना समाजहिताची द्योतक आहे. त्यातूनच 'पावसाच्या करणीचा धरा कहाणी' सांगण्यास पुढे येईल. कृषिवल आणि गावकऱ्यांना बरोबर घेऊन हा कवी जिद्दीने म्हणतो,

'हे उजाड रान आता नांगरणार आहे।
कातळातून पाणी मी प्रवाही करणार आहे
पिढ्यान्‌पिढ्या पडीक रान हे उधाणलेले।
मी त्याचे वहित ओझे वाहणार आहे.'
(पृ. १९)

उजाड रान वहित करण्यासाठी प्रातिनिधिक रूपात तो स्वसामर्थ्याने पुढे येणार असला, तरी त्याला समग्र बळिराजाच्या वंशजांची साथ लाभणार आहे. कृषिवलांचा संसार आज व्यवस्थेने मोडून टाकला, तरी त्यांची मान मात्र स्वाभिमानाने ताठ ठेवण्याचे हे आवाहन लाखमोलाचे आहे. कवीची ही संवेदनशीलता केवळ कवी म्हणून प्रकटली नसून एक सामाजिक बांधिलकीही त्यात ओतप्रोत भरली आहे. आणि हे या कवीचे फार मोठे यश आहे.

या कवितासंग्रहात एकूण पासष्ट कविता समाविष्ट आहेत. यांतील बहुसंख्य कविता ह्या विचारप्रधान आणि म्हणून आवाहनात्मक आहेत. त्यामुळे काही कविता या अंतर्गत लय हरवून बसल्या आहेत. उदा., 'आता शेतकरी', 'नांगरणार आहे', 'बोरं', 'भांडी घासणाऱ्या मुली', 'हाणमार', 'गावगुंड', 'चल विकून टाक शेती', 'दुःखाचे अस्तर' या कविता निव्वळ निवेदनात्मक आहेत. मात्र 'उभा सृष्टीमध्ये देव', 'माझे रान', 'शकून', 'काल आभाळ' इत्यादी कवितांना आशयानुरूप गेयता लाभली आहे. 'जनी', 'सप्ताह', 'माणसे तांड्यातील', 'भोवंडत' या कवितांना संतसाहित्यातील ओवी-अभंगांचा रूपबंध लाभला आहे. त्यातील प्रासादिकतेमुळे कविता सहजसुलभ अंतर्गत लय धारण करते.

उजाड रान, पडीक रान, श्रावणी डोळे, सावकारी विळखे, प्रसिद्धीची वल्कले, अंगावरचा घाम, धस्कट, मूठपसा पीक, स्वप्नाची वासरे, सावकारीचे डोंगर, वेदनेचा पान्हा, तमाचा जाळ, अंधाऱ्या न्हाणीत, पोळत्या उन्हात, ढेकळांचे दिवे, अमृताचा गंध, गाभा बीज, महासत्तेचे माज, फुपाट्याचा थर, संचिताची सखी, दारिद्र्याची खाण इत्यादी अर्थबहुल प्रतिमा अस्सल शेतीमातीच्या रंगारूपांतून साकारल्या आहेत. एखादी नाम्याची दासी 'संचिताची सखी' होऊन भक्तिभाव प्रकटते. त्याचप्रमाणे वामन आणि बळिराजा, श्रीरंग, श्रीकृष्ण, सीता, संत जनाबाई आणि श्री विठ्ठल इत्यादी मिथकांच्या योजनेमुळे कवितेचा आशय वर्तमानाच्या संदर्भात अर्थघन होतो. काही आशयांचा अर्थविस्तारही होतो. या पौराणिक संदर्भांमुळे कवितेची अर्थवत्ता अधिक खोलवर जाऊन पोचते.

कार्पोरेटवाले, मईलकुली, सेझ, एम्सी, सेझवायला, बॉम्ब, हॉर्नबिर्न, ई-पाणी, सर्फिंगचा फेस इत्यादी इंग्रजी शब्दांच्या वापरातून कवी ग्लोबल जगाचे अर्थ ध्वनित करण्यात यशस्वी झाला आहे. औकात, विख, महा, पांदी, उलंगितो, बांडगुळी, जैन्हामंदी, राक्षिस, बैहींयाडी, लागीर, भिया, याडी इत्यादी ग्रामीण शब्द कवितेला अस्सल ग्रामीण रूप मिळवून देतात. कवीचे ग्रामीण जीवनाशी

नातेही त्यातून सूचित होते.

सोन्यावाणी मोल, कुऱ्हाडीच्या पात्यापरी (उपमा), तप्त आगीचा हुरडा, महासत्तेचे माज (रूपक) यांसारखे काही अलंकार सहजपणे आल्याने कवितेचा आशय सुंदर होतो. मात्र पहिल्या ओळीत 'राक्षिस' शब्द आला म्हणून दुसऱ्या ओळीत 'साक्षीस' (पृ. ७०) किंवा पहिल्या ओळीत 'वाट रोखलेली' हे शब्द योजले म्हणून दुसऱ्या ओळीत वस्ती 'गाढ झोपलेली' ही शब्दांची यमकासाठी ओढाताण झालेली दिसते. अशा जागा बऱ्याच नसल्या, तरी कवितेची स्वाभाविकता ठरविणाऱ्या आहेत, असे म्हणावयास वाव आहे.

असे असले तरी, अस्सल ग्रामीण जीवन, शेतकऱ्याची जागतिकीकरणामुळे होणारी दयनीय अवस्था चितारण्यात कवी कमालीचा यशस्वी झाला आहे. त्यामुळेच कैलास दौंड यांची 'या संग्रहातील एकूणच कविता फार रेखीव-आखीव कोरीव अशी नक्षीदार नाही. ती सातत्याने कष्ट उपसणाऱ्या रांगड्या, काटक पण ऐसपैस बोलणाऱ्या ग्रामीण माणसासारखी आहे. म्हणूनच तेवढ्या सच्च्या दिलाचीही ती आहे. अंतरीच्या खोल गाभ्यातून पाझरत उतरलेली ही कविता आहे' हा डॉ. वासुदेव मुलाटे यांचा अभिप्राय सर्वार्थाने खरा आहे. तरीही एक कसदार ग्रामीण कवितेचे मोल या कवितेला लाभल्याने ग्रामीण कवितेच्या प्रांतात तिचे स्थान बरेच वरचे आहे, यात शंका नाही. जागतिकीकरणाच्या आणि 'सेझ'च्या नव्या युगात आपली ओळख हवलेला शेतकरी आणि उघडा-बोडका काळोखात हरवलेला परिसर अन्वर्थक मुखपृष्ठातून सुचकतेने नजरेत भरतो, हो या कविता संग्रहाची आणखी एक जमेची बाजू आहे.

'अंधाराचा गाव माझा' (कवितासंग्रह)
कैलास दौंड. मीरा बुक्स ॲण्ड पब्लिकेशन, औरंगाबाद. पहिली आवृत्ती - २०१२



अनुक्रमणिका

## पुस्तक परीक्षण

# भारतीय कृषिपरंपरेतील कष्टकरी कुळाच्या होरपळीचे आख्यान

विष्णू नारायण पावले

कृष्णात खोत हे मराठीतील सर्वपरिचित असे प्रमुख कादंबरीकार. एकाच परिसरात राहून त्या परिसरातील बोलीभाषेसह जीवनातील अनेकविध जाणिवांचा, ताण्या-बाण्यांचा, विस्कटत्या राजकारणाचा, निसर्गाच्या आदिम रूपाचा समकाळातील बदलत्या स्वरूपाच्या संदर्भात समर्थ आविष्कार त्यांच्या लेखनात आढळतो. 'गावठाण', 'रौंदाळा', 'झड-झिंबड' या कादंबऱ्यांबरोबरच बदलत्या ग्रामजीवनाचा वेध घेणाऱ्या, प्रश्न मांडणाऱ्या कथा व आरसपानी व्यक्तिचित्रेही त्यांनी रेखाटली आहेत. पृष्ठसंख्या, मूल्य व आकारमान या बाबतीत प्रारंभी 'गावठाण'ची आठवण करून देणारी 'धूळमाती' ही एप्रिल २०१४ ला प्रकाशित झालेली कादंबरी आहे. ही कादंबरी येण्यापूर्वी महावीर महाविद्यालय, कोल्हापूर येथे एका पुस्तकप्रकाशनाच्या समारंभाचे प्रमुख पाहुणे म्हणून मनोगतात, "लेखकाचा उद्गार ही त्याची क्रांती आहे. तो विचार आज लक्षात येईल. वीस वर्षांनी लक्षात येईल, कदाचित शंभर वर्षांनी लक्षात येईल. आज काय झालंय खेड्यांमध्ये? आमच्याकडे असणारी उपजाऊ जमीन कोण घेतंय आज? जो कधीही मूठभर धान्य पेरणार नाहीत, अशी माणसं आमची उपजाऊ जमीन घेतायत्. गावच्या असणाऱ्या तिष्ठ्यातिष्ठ्यांवरती काहीही कळत नाही, सातबारा कळत नाही, ते व्यवहार करतंय. ते व्यवहारतनं असं सांगत असतंय, ज्याला काहीही कळत नाही त्याला सांगतंय की, 'हिथली जमीन तू एवढ्या-एवढ्याला घेऊन टाका.' ती जमीन विकली जाते. मला धोका असा वाटतो की, जरी जमीन विकली गेली तरी बेजबाबदार राहून चालणार नाही त्याला. जमीन विकली पाहिजे पिकवणाऱ्या माणसालाच. उपजाऊ जमीन जेव्हा कमी होते, तेव्हा देशाचं नुकसान हे जादा होणार आहे. जमीन कुणी घेतली? तिथे असणाऱ्या बिल्डरनी, जमिनी कुणी घेतल्या? तिथे असणाऱ्या दुकारदारांनी, उद्योगपतींनी. कशासाठी? कंपाउंड घालून घर बांधायचं; काही ना काही उभं करायचं. तिथं पीक येऊ द्यायचं नाही, यासाठी जमिनी घेतल्या. माझ्या असणारा शेतीचा व्यवहार हा ज्या वेळी व्यापार होतो तेव्हा शेतीसंस्कृती नष्ट व्हायला लागते. शेतीसंस्कृती ही दिक्काल व्यापते. माझी आई ज्या वेळी चहा घेते, त्या वेळी चहात बोट बुडवते व अशी टिचकी मारते. काय व्यवहार असावा त्यामागं? तर इथली किडामुंगी जगावी हा. आमच्या शेतीचं काय वाटोळं झालं....." (दि. ७ सप्टेंबर, २०१३) असे कादंबरीकार कृष्णात खोत यांनी म्हटले होते. त्याचेच व्यापक रूप म्हणजे ही कादंबरी आहे. विशेष असे की, आख्यानाचा रूपबंध मुरवणारी कादंबरी आहे.

या कादंबरीचा निवेदक (सूत्रधार) राजबा याच्याच तोंडून (प्रथमपुरुषी निवेदन) 'बँकेत होतो. गावाला आठ-पंधरा दिवसांतनं जात होतो', अशी या कादंबरीतल्या आख्यानाची सुरुवात होते. बँकेत साधा क्लार्क असणारा नि लग्नाला नुकतेच चार महिने झालेला राजबा गावी जायला निघतो. कोल्हापूरपासून त्याचे नोकरीचे ठिकाण पंधराएक तर त्याचे गाव शंभरेक किलोमीटरवर आहे. गावाकडून फोन येतो की, तू येऊन जा. अचानक का बोलावलं असावं, यामुळे तो चिंतेत आहे. अनेक अडी-अडचणींशी सामना करत, शिवारमातीत राबून तो शिकला आहे. या शिक्षणामुळेच आता तो बँकेत नोकरीला आहे. आणि त्याच्या पूर्ण कुटुंबाची भिस्त त्याच्यावरच आहे. आणि या प्रवासादरम्यान वडिलांविषयीच्या एकेक घटना त्याला आठवत राहतात. मात्र गावाकडे अचानक का बोलावले असावे, याची त्याला कल्पना नाही. घरी पोचल्यानंतर त्याला सांगितले जाते की, आपण कसत असलेला "नारगुंडीचा माळ दाजीनं इकाय काढलाय." मग मात्र त्याच्या चिंतेत अधिकच वाढ होते. दाजी हा गावातला सावकार आहे. तो चार गावचा उत्पन्नदार आहे. मात्र तो मरणाआधी स्वत:चे सरण रचून घेईल,

या प्रवृत्तीचा आहे. चहाची वेळ साधून दुसऱ्याचं घर गाठणारा आहे. असे अनेक त्याचे दुर्गुण आहेत. परंतु त्याच्या मुलाला (शंकरला) कोणा एका पाहुण्याकरवी शिपाई म्हणून भरती करण्यासाठी लाखभर रुपयांची गरज आहे. तो शंकर कसाबसा गचके खात पदवीपर्यंत शिकलेला आहे. दाजी ज्या जमिनीचा व्यवहार करावयाचा म्हणतो, तो नारगुंडीचा माळ राजबाचे वडील (दादा) गेल्या वीसेक वर्षांपासून कसत आहेत. म्हणून हा माळ त्यांनाच द्यावा असे दाजी सावकाराचे मत आहे. परंतु क्लार्क असणारा राजबा आपल्या व्यवसायनिष्ठेमुळं व्यवहारवादी विचार करतो, की आपण देणाऱ्या पैशामधून भातपीक व्याजात (एकूण रकमेच्या) दोन वेळा विकत घेतल्यागत होणार आहे. त्या वेळी त्याचे वडील, "शेतसरीचा ईशोब असा मांडायचा नसतो राजबाऽ, आरं, धा वसांतनं का असंना, तः कवातरी शेतकऱ्याला वर काढतो..." असे मत मांडतात. नारगुंडीचा माळ म्हणाल, तर अनेक कुणग्यांचा, सतराशे साठ बांधांचा, अठराशे आठ दगडांचा, गुंड्यांचा... पण वीसएक वर्षांपासून राबणाऱ्या वडिलांच्या देहाचाच भाग बनला आहे. निदान यासाठी तरी तो माळ घ्यायचे निश्चित होते. आणि हा साधारणतः सव्वा दोन-अडीच एकराचा माळ या कष्टकरी कुळालाच देण्यात दाजीची झाकली मूठ सव्वा लाखाची आहे. हा तोंडी व्यवहार लाखाला ठरतो. राजबाचे दादा, थोरला भाऊ (आण्णा) व राजबा हे तिघे बापलेक पायाला भिंगरी बांधून पैसे जमविण्याच्या मार्गी लागतात. पै-पाहुण्यांच्या दारात जातात. तेव्हा तो माळ घेऊन काय करणार? पैसे कशाला गुंतवताय? अशी संबंधितांकडून हेटाळणी होते. व्याजावर व घरातील दाग-दागिने गहाण ठेवून पैसे उभे केले जातात. रात्री जेव्हा हे बापलेक घरी असतात, त्याच वेळी एक बनेल माणूस घरी येतो आणि "याक आगाव वॉट द्याचं" असं म्हणतो. आणि त्याच्या बोलण्याचा अर्थबोध जेव्हा तिघांना होतो, तेव्हा मात्र त्यांच्या पायाखालची भूई हादरते. या कानाचे त्या कानाला कळूही द्यायचे नसताना ही बातमी बाहेर फुटली कशी, यामुळे हे तिघेही अस्वस्थ होतात. राजबाच्या आईची सुनेवर आगपाखड होते. तिच्या मनाला सल लागतो. दुसऱ्या दिवशी दाजीच्या घरी जेव्हा हे बापलेक जातात, तेव्हा तिथे चौघेजण बसलेले आढळतात. आणि इथून पुढे खऱ्या अर्थाने संबळ वाजतो.

गुपचूप ठरलेला हा व्यवहार दाजी मुलाच्या नकाराचे कारण पुढे करून मोडतो. अधिक पैशाच्या लालचीमुळं दाजीच्या तोंडाला पाणी सुटते. ठरलेल्या व्यवहारात काड्या घालणारे बन्या, गणू, भिका, पाटील, म्हादूण्णा ही पैसेवाली मंडळी असतात. नावाप्रमाणेच सरळ-साध्या दादांना या घटनेचा धक्का बसतो. भाऊअण्णा तर पिसारू पाड्यासारखा धुमसतो. दाजीच्या सावकारकीला हिसका दाखविण्याची भाषा करतो. पाहुण्याकडून व्याजानं पैसे उचलणारा राजबा मात्र 'व्याजाला डबरा आक्कलंखातर' असेच म्हणतो. आई वहिणीवर आगपाखड करते. वहिणीचा कोंडमारा होतो. आजवर कोणतीही व्यवहारवादी दृष्टी न ठेवता या माळात हे कुळ राबलेले... त्याचं काय? या घटनेच्या अनुषंगाने दाजीसंबंधीच्या उखाळ्या-पाखाळ्या निघतात. त्याच्या वृत्तीचा निषेध नोंदविला जातो. या विमनस्क अवस्थेतच दादा तिसऱ्या दिवशीच्या सकाळी माळात जाऊन तिथली धूळमाती कपाळी लावलात. नारगुंडीबाबापुढं हात जोडतात. "निम्मा जल्म झाला, तू पोसलंस तुझ्या या मातीवर. आता पुढल्या जल्मात तुझी नि माझी या मातीसाठीच पडली तर गाठ न्हाईतर कुठली आली?" असे म्हणून डोळ्यांतील पाण्याचा निवद दाखवतात. तोच थोरला अण्णा उचलणीचा दगड घेऊन नारगुंडीबाबावर दगड घालतो. वाचकाला इथे मुळापासून हादरा बसतो. इथे उच्चतम परिणाम साधला आहे. आणि तिघेही बापलेक नात्यातल्या माणसाची माती सावडून आल्यासारखे घराकडे निघतात. असे हे तीनएक दिवसाचे आख्यानकथासूत्र आहे.

मात्र हे एवढ्यापुरतेच मर्यादित न राहता सबंध कृषिपरंपरेच्या विघटनाविषयीचे, ग्रामीण भागात चालणाऱ्या सावकारकीच्या अंकुशाचे काहीएक प्रभावी विधान करते. दुसरे असे की, या कादंबरीचा रूपबंध हा आख्यान मुरवणारा आहे. आख्यानाचा रूपबंध म्हणून विचार करत असताना आख्यानाचे स्वरूप समजून घ्यावे लागते. आख्यानाला पूर्व व उत्तररंग असतो. मुख्य सूत्रधार हा निवेदन करत असतो. पद्यापेक्षा निवेदन, निरूपण, कथाकथन यांचा अधिक समावेश होतो. लहानलहान

अनुक्रमणिका

दोन आख्यानेही सांगितली जातात. मुख्य पात्रासंबंधी व त्याच्या विरुद्ध संबंधीचे लीलादर्शन असते. या मूळ कथानकाबरोबर दुसरी उपकथानके घुसडली (निमित्त साधून) जातात. संवादाची योजना कालानुरूप व प्रसंगानुसार असते. मुळात ही आख्याने पौराणिक विषयाबरोबर लौकिकही असतात. लौकिक आशय हा भक्तिप्रसार व सामाजिक नीतीच्या प्रसाराच्या उद्देशामुळे विस्तारतो. अखेरी श्रोतृहृदयाचा भार उतरला जातो. याचा आकृतिबंध हा लवचीक आणि स्वयंभू असतो. काही सहजगत्या आलेल्या (प्रसंगोपात) स्पष्टीकरण, दंतकथा असतात. संघर्षप्रसंगही येतात. अशा अर्थाचा आख्यानाचा रूपबंध (कथनपरंपरा) असतो. आणि आख्यान हे काहीतरी औचित्य साधून लावले जाते.

प्रस्तुत कादंबरीत हा रूपबंध मुरवला आहे. कादंबरीच्या प्रत्यक्षदर्शनी वाचनात ही प्रक्रिया उमजेलच. परंतु आख्यानाप्रमाणे पूर्वरंग-उत्तररंग हा कादंबरीच्या चार प्रकरणांमध्येच मुरवला आहे. सूत्रधाराप्रमाणे राजबाचे निवेदन हे मुख्य नायक दादांना समोर ठेवून नारगुंडीबाबाच्या माळाच्या संबंधाने दाजीच्या सलत्वाला निर्देशित करते. अर्थात निवेदकाचे गावाला जाणे, व्यवहारासंबंधी बोलणी होणे, पैशाची (व्याज आकारलेल्या) जमवाजमव करणे आणि दाजीचे मुलावर ढकलणे, अधिक पैशांमुळे केलेला विश्वासघात, या चढाओढीतल्या मानवी वृत्ती-प्रवृत्तींचे दर्शन व अधिक पैसेवाल्यास दिली जाणारी जमीन, आणि ऋणाइत दादांनी नारगुंडीबाबाचे दर्शन घेणे व त्याचीच विद्रोहात्मक प्रतिक्रिया म्हणून अण्णाने नारगुंडीबाबावर दगड घालणे हा कथाभाग? आख्यानाच्या रूपबंधात कादंबरीच्या संरचनेचा विचार करता येतो. एकामागून एक सांगितल्या जाणाऱ्या घटनांचे राजबा प्रांजळपणे लोकसमूहासमोर निरूपण करतो आहे. घटनांमागून येणाऱ्या एकेक घटना या त्या-त्या मानवी वृत्ती-प्रवृत्तीविषयी स्पष्टीकरण देतात. या घटना त्या त्या कालानुरूप-प्रसंगानुरूप येतात. जाळीखाली नारगुंडीबाबा गडप झाल्याची एक दंतकथाही येते व त्याचे महत्त्व ठसविणारी धनगराची मेंढरे हरवल्याची कथा येते. नारगुंडीबाबाला हात जोडल्यावर ती सापडतातही.

आत्मगत असावेत तसे काही संवादही आढळतात. विशेषतः दाजीने व्यवहार मोडल्यानंतर त्याच्याविषयीच्या, त्यांच्या वृत्तीला निर्देशित करणाऱ्या प्रसंगानुरूप अनेक घटना-प्रसंगाचा माहोल उभा केला जातो. तसेच आख्यानाच्या रचनेत कधीकधी दोन आख्याने लावली जातात. या कादंबरीचा विचार करता मुख्य कथासूत्र हे जमीनमालकाकडून विश्वासघाताने फसविल्या गेलेल्या कुळाच्या होरपळीचे आहे, तर दुसरे उपकथासूत्र (आख्यान) हे भारतीय स्त्रीकडे (विशेषतः ग्रामीण भारतीय) आजही पाहिल्या जाणाऱ्या परंपरागत दृष्टीचे आहे. राजबाची आई स्वतःच्या सुनेस नाहक बोल लावते. त्याचे वरपांगी दृश्य कारण ज्या दिवशी सकाळी सोप्यामध्ये दाजी व्यवहारासंबंधी बोलणी करण्यास बसला आहे, त्या दिवशी सकाळी तिला पाण्याला जायला उशीर झाल्यामुळे शेजारच्या हौसावहिनीचा घरात प्रवेश होणे (पाण्याला चल म्हणण्याच्या निमित्ताने) व ही बातमी गावभर होणे हे आहे. तर दुसरे अदृश्य (पण महत्त्वाचे) कारण तिला अजूनही मूलबाळ झालेले नाही, हेही आहे. म्हणजेच समाजमान्यतेसाठी स्त्रीला पुत्रप्राप्ती होणे हे महत्त्वाचे आहे. त्यामुळे राजबाच्या वहिनीची अगतिकता तिच्याशी केल्या जाणाऱ्या काही वर्तनातून, तिला बोलल्या जाणाऱ्या शब्दांतून, मारण्यास उठलेल्या प्रसंगांतून दिसते. थोरला आण्णा (तिचा नवरा) तिला मारावयास उठतो. तिचा कोंडमारा होतो. हा भारतीय स्त्रीचा शोषित चेहरा आहे. तर याच्या उलट दाजीच्या आईचा एक सात्त्विक चेहराही या कथानकात येतो. तिने आजतागायत कोणत्या गोष्टीत दादाच्या कुटुंबाला बोल लावलेला नाही. तर उलट 'माळाचा मळा केला' म्हणून तिचे अंतःकरणही सुखावले आहे. त्यांनी घेतलेल्या पिकात भांडून-हट्टून काही घेऊ नको, म्हणून ती सुनेस सांगते. दाजीची आई उदार अंतःकरणाची आहे. मोठ्या मनाची आहे. असा हा एका सात्त्विक चेहरा आहे.

या दोन्ही सूत्रांचा भारतीय शेतीसंदर्भात विचार व्यक्त होतो. पिकाऊ शेती हे उत्पन्नाचे स्थिर साधन असल्याने ती महत्त्वाची आहे. परंतु पडीक जमीन तितकीशी महत्त्वाशी वाटत नाही. जणू ती वांझ स्त्रीच आहे. (आपल्याकडे अजूनही स्त्रीच्या सृजनाचा शेतीच्या बीजधारणेशी संबंध जोडला जातो.) पण कादंबरीतून

आडवळणाने कोल्हापूर-जोतीबाच्या आसपासचा डोंगर, कुरणे, माळराने ही मोठमोठ्या बिल्डर्स, उद्योगपती, राजकीय लोक यांनी खरिदल्याचा उल्लेख येतो, हा भाग एकीकडे. म्हणजेच कथाभागामध्ये असणाऱ्या कष्टाळू दादांकडे श्रम आहे परंतु वित्त नाही आणि नावाप्रमाणे दादागिरीही नाही. मात्र जमीन खरेदी करणाऱ्यांकडे वित्त आहे, परंतु श्रमाची ऊर्मी (प्रवृत्ती) नाही. दादांच्यासह कुटुंबाने पंधरातीन आठवडे बैला-माणसांसह राबून मोठी ताल बांधली आहे. माळरानाची जमीन पिकाऊ बनवली आहे. नापीक जमीन पिकाऊ केली आहे. ती उपजाऊ जमीन आळश्यांच्या हातात जाते. अधिक पैशापोटी कुळाच्या आजवरच्या कष्टावर पाणी सोडले जाते. म्हणजे मातीचे पुन्हा एकदा निर्बीजीकरण. कुळाच्या प्रदीर्घ शोषणाचा संदर्भ रेखाटते म्हणून लौकिक पण समकाळाच्या संदर्भातले हे आख्यान. लवचीक परंतु स्वयंभू रूपबंध या कादंबरीत आढळतो. म्हणून ही कादंबरी आख्यान वाटते. सावकारकीचा वचक ठेवून कुळाच्या राबणुकीला भाग पाडणारी अशी कितीतरी उदाहरणे या निमित्ताने आपल्या नजरेसमोर येतात.

मानवी मनातील सूक्ष्म स्पंदनांना प्रभावीपणे टिपले जाण्यात लोकव्यवहाराची एक रीत सांगितली आहे. दैनंदिन वापरातील शब्दप्रयोगांचा आणि म्हणींचा नेटका वापर बोलीभाषेमुळे अधिक परिणामकारक रीत्या साधला आहे. बदलत्या काळातील सामाजिक जाणिवा या सत्यतेच्या पातळीवर किती आणि कशा तग धरून राहतील, हाही प्रश्न उरणार आहे. विश्वास हा औषधापुरताही उरू नये, त्यामुळे विश्वासावरचा विश्वासच उडून जातो की काय, याचेही सूतोवाच या निमित्ताने घडते. कथाभागात येणाऱ्या प्रत्येक वृत्ती-प्रवृत्तीविषयी स्पष्ट रीत्या काही कथा जोडल्या आहेत, त्या खूप मथितार्थाने. पात्रांची विशिष्ट नावेही (उदा., बन्या : बनेल, म्हाद्: महाधूर्त, दादा : सरळ) वेगळ्या वृत्तीचे गमक साधतात. तर पूर्वरंगातल्या गणूचा पुढे उत्तररंगात गण्या होतो. भिका चा भिक्या होतो. यावरून मनातील रागरंगांची तीव्रता पडताळता येते. तर 'सगळीच हात खरकाटं करून उठली' (पृ. ८१) या वाक्यात कुटुंबाच्या नाराजीचे, फसवणुकीच्या आघातामुळे अन्नावरच्या उडालेल्या वासनेचे चित्र पुढे उभे राहते.

तसेच 'सारं गाव निजलं होतं.' अंधारात आमचं बोलणं चाललं होतं (पृ. २४), 'अंधार आता अजगरागत फुगाय लागला.' 'सारीच ज्या-त्या जागेवर घुटमळल्यागत झाली' (पृ. ५१), 'रात्र अजगरागत सरकली. भगाटलं' (पृ. ५८), 'रक्सं घातल्यागत झालं, अंधार माजाय लागला. सारं सैरभैर झालं' (पृ. ८०) अशा छोट्या- छोट्या वाक्यांमधून प्रसंगांची परिणामकारकता वाढविली आहे. तर अजगराच्या प्रतिमेतून दुर्गुणाची विशेषता मनावरती ठसविली आहे. राजबाच्या आईच्या तोंडून प्रकटणाऱ्या म्हणी (उदा., आडानटिंगी नि बिनटांगी, मोडक्या कूपाला वावटूळ बघील, गाव बोलवीना नि तराळ इचारीना, धाळकांड धर खरं माझ्या पोरासंगं लगीन कर, बडा घर नि पोकळ वासा, नाचून नाचून उठतील कूरपं पासास्नी नि करचीला भर देवास्नी) भावनेची तीव्रता दर्शवितात.

नारगुंडीबाबा हा जरी त्या शिवारातला देव असला, जरी आधार असला, तरी तो प्रतीकाच्या रूपातच कादंबरीत वावरतो. तो ग्रामीण भागातल्या बड्या भूखंडधारकाचे, सावकारकीचे ओबडधोबड रूप म्हणून आला आहे. शोषणाचा संदर्भ घेऊन राहिला आहे. त्याची पाळेमुळे कितीही खणली तरी खोलवरच रुजली आहेत. म्हणून निवेदकाच्या तोंडची, 'आणि आम्ही परंपरागत गरिबीत रग असली, तरी अंड बडवलेल्या बैलागत शेवटी' (पृ. १०१), 'देव दाजीगत हिरवागार हसत होता' (पृ. १०६) ही महावाक्यं होत. आजवरच्या पिढ्यान् पिढ्यांच्या शोषणाच्या संदर्भांची चिकित्सा करावयास भाग पाडणारी होत. तसेच 'राजबाचे दुपारी बारा वाजता एस्टीत बसणे व झावळ पडताना गावात घरात येणे आणि तिसऱ्या दिवशी प्रखर उन्हात माती सावडल्याप्रमाणे परत फिरणे' यातही लेखकीय भानाचा नेटका विचार प्रकटतो. तर नारगुंडीच्या नावाचे, संदर्भघटनांचे आणि कादंबरीच्या शीर्षकाचे एक रूपकच साधले आहे. आयुष्यभर त्या भगभगीत माळाशी झट्याझोंब्या घेऊनही आयुष्याची माती झाली तरी मुर्दाडांना, धनदांडग्यांना पान्हा फुटत नाही. मानवी जीवनाच्या अखेरची मातीही तिसऱ्या दिवशीच सावडली जाते, हे आहे.

आयुष्यभर ज्यांच्या शब्दाला मातीचा वास येतो,

त्या दादांची व्यक्तिरेखा इथल्या परंपरेतील मूळ शेतकऱ्याचीच आहे. कोळपा ओढताना चुकून जरी मोडावरती पाय पडला तरी, "तुझ्या डोस्क्यात असा कोणतरी नाचला तर तुला काय वाटंल?" (पृ. १३) अशी भूमी, पीक यांविषयीची निष्ठा, आस्था असणाऱ्या हाडाच्या शेतकऱ्याची आहे. एवढेच नव्हे तर पशु-पक्षी, पीकपाणी, संस्कृती यांसंबंधी असणाऱ्या जिव्हाळ्याची आहे. 'सुरुवातीला ज्या मातीसाठी (माळासाठी) अर्धेअधिक आयुष्य खर्ची घातले, त्याची 'धूळमाती' येते ती 'अंधारात उजेड पसरावा' असे बोलणाऱ्या दादांच्या भाळी. हे भयंकर आहे. पण दुसऱ्या पिढीचा प्रतिनिधी अण्णा याच्या कृतीतून विद्रोहाची व तरुणांच्या बदलत्या मानसिकतेची जाणीव दर्शनीय होते. जरी दादांच्या श्रद्धारूपाशी तो जीवघेणा खेळला असला, तरी तो आपले संदर्भ तपासणारा वाटतो. कादंबरीभर नारगुंडीबाबाला – प्रामुख्याने माळाला मुख्य आशयसूत्राशी जोडून लक्षणीय स्वरूपाचे चित्र मांडले आहे, जे महाराष्ट्रातल्या अनेक प्रदेशांतील कष्टकरी कुळांचे आहे.

भारतीय शेतीव्यवहार हा नेहमीच आतबट्ट्याचा व निसर्गाच्या लहरीपणावर विसंबून असला, तरी तो महान आहे. महत्त्वाचा आहे. परंतु शोषणाने, सावकारकीने, आधुनिक वित्तसुलभतेले/सुबत्तेने, बदललेल्या मानसिकतेने त्यावर आज आपल्या अजस्र नख्या रोवल्या आहेत. आक्रमण करून कसणाऱ्यांच्याच पिढ्या नेस्तनाबूत करण्याचा चंग बांधलाय की काय? ही झळ सच्छिलांच्याच वाट्यास का? हे प्रश्नही बाळ ठाकूर यांनी बनविलेल्या मुखपृष्ठावरील बरड जमिनीवर पडलेल्या पक्ष्याच्या काळ्या सावलीने अधिक गडद केले आहेत. सूक्ष्म ताण, सच्छिलता, भय, कल्पनेच्या पलीकडच्या ग्रामीण माणसांच्या वृत्ती-प्रवृत्ती, आजवरची (आर्थिक, मानसिक, शारीरिक) पिळवणूक, मानवी विकारांमुळे वाट्यास आलेली होरपळ या सर्वांचे विविध पदर कादंबरीच्या ठायी आहेत. कुळाची होरपळ ही एका कुटुंबाची असली, तरी भारतीय स्तरावरील शेती-शेतकरी यांसंबंधाने आजची उपजाऊ जमीन पुन्हा नापीक करण्याचे उद्योग, पिढ्यान्-पिढ्यांचे शोषण यांबाबतचा व्यापक विचार सांगणारी प्रातिनिधिक कादंबरी आहे. घटना जरी सीमित असली, तरी एका कष्टकरी कुळाची ही कहाणी प्रचंड मोठ्या अजस्र काळाचेही रूपित आख्यान सांगणारी आहे. हे जरी भिडणारे असले, तरी जमिनीसारखाच कष्टकरी होरपळतो त्याचे काय? त्याच्या हाडामांसात रुतून राहिलेला सावकारकीचा अंकुश तो झुगारेल काय? म्हणून हे आख्यान संदर्भांची उजळणी करते.

कादंबरीचे नाव : धूळमाती
लेखकाचे नाव : कृष्णात खोत
मुखपृष्ठ/रेखाटने : बाळ ठाकूर
प्रकाशक : मौज प्रकाशन गृह, मुंबई.
पृष्ठसंख्या : १०६
मूल्य : एकशेपंचवीस रुपये.
कादंबरीकार कृष्णात खोत
भ्रमणध्वनी : ९४०३४५०५४१.



## वाचकांचा पत्रव्यवहार

चंद्रशेखर बर्वे.
बी ४, रामबाग,
पुणे ३०

मा. संपादक,
नवभारत मासिक यांस,
स. न. वि. वि.

ऑगस्ट १५ च्या अंकातील 'भीमसेन जोशी यांची गायकी' हा ग. उ. थिटे यांचा लेख केवळ अप्रतिम आहे. यापूर्वीच्या त्यांच्या 'कट्यार काळजात घुसली' व महाराष्ट्रातील कीर्तनपरंपरा यावरील दोन लेखांप्रमाणेच याही लेखात रसिकता व तर्कनिष्ठता यांचा सुरेख संगम पहावयास मिळतो.

हा लेख काही आठवणी जाग्या करणारा व काही विचार स्मरणोज्जीवित करणारा आहे. या आठवणी व हे विचार येथे नमूद केल्यास ते मूळ लेखाला पुष्टी देणारे व पूरक होणारे ठरेल, असे वाटते. असे केल्याने हे पत्र मोठे/विस्तृत होईल; पण ते वाचकांच्या आकलनात भर घालेल.

थिटे यांनी भीमसेनांच्या गाण्यातील 'जोश' किंवा शारीरिक सामर्थ्य याचा परामर्श घेतला आहे. या संदर्भात-पूर्वी मी राहत होतो त्यापलीकडे दोन घरांच्या अंतरावर भीमसेन राहत असत, तेव्हा ते येता-जाता दिसत, त्यांच्या चालण्यात/चेहऱ्यावर पैलवानाचा जोम/ आत्मविश्वास विलसत असे. याचे मूळ व्यायाम, श्रद्धा, ध्यान-धारणा, एकूण तपस्या यांत होते; हे हळू-हळू कळत गेले. पहाटे त्यांचा रियाज चाले. तो थंडीच्या दिवसांत माझ्या घरी स्पष्ट ऐकू येई आणि त्यामधील तेज, चापल्य जाणवून अंगावर रोमांच उठत.

या 'जोशा'वर वयाचा परिणाम झाला, तरी तो जवळजवळ अखेरपर्यंत टिकून होता अशा आशयाची नोंद थिटे यांनी पुढे केली आहे. या संदर्भात पुण्यात रमणबाग हायस्कूलच्या पटांगणात झालेल्या गाण्याच्या वेळी याचे जिवंत प्रत्यंतर आले. तेव्हा असे मनात आले, की भीमसेनना 'स्वरभास्कर' म्हणतात, तसे 'स्वरसिंह' म्हणावे; ते सार्थ ठरेल असा सम्राटाचा शक्तिसंपन्न रुबाब उतारवयातील त्या गाण्यातही होता. संगीतसमीक्षक कै. श्रीरंग संगोरामांनी त्यांच्या एका लेखात 'मेट्रो गोल्डविन मेयर'च्या विख्यात सिंहाची उपमा दिल्याचे त्यांनी मला सांगितले.

भीमसेन 'गानवीर' होते असे थिटे यांनी म्हटले आहे, ते पूर्णपणे अन्वर्थकच आहे; फक्त यात एक भर घालायला हवी- 'वीररसां'चा स्थायिभाव 'उत्साह' भीमसेन यांच्यात पुरेपूर होताच, पण त्याच्या जोडीला 'युयुत्सू'-'जयिष्णू' वृत्तीही ओतप्रोत होती. आणि म्हणून तर त्यांचे गाणे खऱ्या व पुऱ्या अर्थाने 'कालजयी' ठरले.

आणखी एक - दुसऱ्याच्या गाण्यात ऊर्जा जागृत करील अशी ऊर्जस्वलता भीमसेन यांच्या गाण्यात (मुळात त्यांच्यातच) होती. एकदा पुण्यातच, स. प. महाविद्यालयाच्या 'स्टुडंट्स हॉल'मध्ये एका नामवंत प्रतिभावान विदुषीचे गाणे होते. पूर्वार्धात काही केल्या ते रंगेना; पण उत्तरार्धात समोर भीमसेन येऊन बसले आणि मग ते गाणे इतके प्रज्वलित झाले, की 'दीप' रागाचा तो प्रभाव, साक्षात्कार वाटावा. असो.

एका खूप महत्त्वाचा मुद्दा थिटे यांनी मांडला आहे-"तेच तेच ते पुनः पुनः गात हे म्हणणे अर्धसत्य आहे." पूर्ण सत्य



अनुक्रमणिका

सांगताना थिटे यांनी जे सविस्तर, सोदाहरण विवेचन/विवरण केले आहे ते एतद्विषयक (व्यर्थ) वाद संपवणारे ठरावे. “त्याच त्या रागामध्ये प्रत्येक वेळा काही वेगळी रंगत आणि अवीटपणा होता...” हे थिटे यांचे म्हणणे पूर्णतः स्वीकारार्ह असेच आहे. याबाबत असेही म्हणता येईल, की नवा राग निर्माण करणे, नवनवीन राग सादर करणे सोपे नाही; पण ‘तोच तोच राग’ गाताना त्याला जास्त झळाळी देणे, त्याची नवी झलक दाखवणे अधिक अवघड, आव्हानात्मक असते. हे आव्हान यशस्वीपणे पेलण्याची ताकत, मुख्य म्हणजे प्रतिभा, भीमसेनांजवळ प्रकर्षाने होती.

अनवट राग, नव(स्व)निर्मित राग याबरोबरच नाट्यचित्रसंगीत, अभंग-भजनं (भावगीतही) भीमसेनांनी प्रचुर प्रमाणात, प्रभुत्वाने गायिली हे थिटे यांनी संक्षेपाने, पण नेमके दाखवून दिले आहे. त्यांनी भीमसेनांच्या उत्तरोत्तर होत गेलेल्या स्पष्ट शब्दोच्चारांविषयी मार्मिक उल्लेख केला आहे. याच्याच जोडीला अनलंकृत म्हणूनच परिणामकारक भावपूर्णतेकडेही लक्ष वेधावेसे वाटते. जीव ओतून ते गात आणि शब्दांत, भावार्थात ते जीव भरत, हे विशेष होय. (‘अधिक देखणे तरि...’ हा अभंग किंवा ‘सखी मंद झाल्या तारका., हे भावगीत या दोन ध्वनिमुद्रिका ऐकून/आठवून बघाव्या.’ इति अलम्.)

लेखाच्या अखेरी, ‘कलात्मक’×‘व्यावसायिक’, ‘विद्वज्जन’ × ‘सामान्य अज्ञजन’ अशा द्वंद्वांविषयी लिहून थिटे यांनी समारोप केला आहे. “....सामान्य, अज्ञ श्रोत्यांमध्ये असलेल्या लोकप्रियतेच्या आधारावर भीमसेन जोशींची श्रेष्ठता स्वीकारावी लागेल”, हा थिटे यांनी दिलेला निर्वाळा ग्राह्यच आहे. पण एक पुस्ती जोडायला हवी - ‘ज्ञानदेव-तुकोबां’ची पारायणे केल्यामुळे (पंडितांसारखे कळले नाही, तरी) वारकऱ्यांना त्यांचा ‘भावार्थ’ भावतो-भिडतो, कमी समजले तरी सगळे उमगते. असेच भीमसेन जोशी यांचे गाणे सामान्य श्रोत्यांना भावते-भिडते, समजण्याआधीच उमगते, हे त्रिकालाबाधित सत्य आहे. अशा सत्याधिष्ठित निर्णयाचा आदर करणे, क्रमप्राप्त, अपरिहार्यच होय. जे लोकप्रिय ते नगण्य-कमअस्सल असे म्हणून अधिक्षेप करणे केव्हाही चुकीचेच; उलट, ‘लोकप्रिय’ हे ‘श्रेष्ठ’ ही असू शकते/असते, असे प्रांजळपणाने कबूल करणे हेच खरोखर न्यायाचे.

अशी पुस्ती जोडली तरी थिटे यांनी शेवटी सांगितलेले ‘तात्पर्य’ (“लोकोत्तर ‘जोश’ आणि ‘होश’ यांनी परिपूर्ण अशा समृद्ध तसेच वैविध्यपूर्ण गायकीमध्ये भीमसेन जोशींच्या लोकप्रियतेचे रहस्य आहे; तसेच ती असामान्य लोकप्रियता हे त्यांच्या श्रेष्ठत्वाचे गमक आहे.”) दुरुस्त करण्याची मुळीच आवश्यकता नाही.

तरुण पिढीला सम्यक् दृष्टी देणारा अप्रतिम लेख लिहिल्याबद्दल - भीमसेनांच्या गानविश्वाचे ‘सबाह्य-अभ्यंतर’ दर्शन घडवल्याबद्दल थिटे यांना अंतःकरणपूर्वक धन्यवाद.



---

## लेखकांचा परिचय


◈ **प्रा. श्री. मा. भावे**

माजी प्रपाठक व विभागप्रमुख, गणित विभाग, नौरोजी वाडिया कॉलेज, पुणे; गणित व तत्त्वज्ञान या विषयांत पीएच. डी. व पदव्युत्तर संशोधन; शिक्षकचळवळीत सहभाग; शिक्षण, गणित व तत्त्वज्ञान या विषयांवर २५ शोधनिबंध.

***पत्ता :–*** ३३/२०, ४ थी गल्ली, प्रभात रोड, पुणे – ४११००४. दूरध्वनी :- (०२०) २५६७४०९३.

◈ **प्रा. डॉ. बालाजी चिरडे**

नांदेड येथे पीपल्स कॉलेज मध्ये राज्यशास्त्राचे प्राध्यापक म्हणून कार्यरत.

***पत्ता :–*** पीपल्स कॉलेज, नांदेड



अनुक्रमणिका

◈ **प्रा. डॉ. एच. व्ही. देशपांडे.**

Ph. D. साठी इंग्रजी विषयाचे मार्गदर्शक, शिवाजी विद्यापीठ गुणवंत शिक्षक पुरस्कार, IAAS (Indian Association for /American Studies) चे २ वेळा कार्यकारी सदस्य.

***पत्ता :—*** ८२० ई, शाहूपुरी ४थी गल्ली, कोल्हापूर- ४१६ ००१. दुरध्वनी : (०२३१) ६५११५५६.

◈ **डॉ. अशोक कृष्णाजी जोशी**

इंग्रजी या विषयाचे प्राध्यापक (निवृत्त), गोवा विद्यापीठ. सौंदर्यशास्त्र, समीक्षा, तत्त्वज्ञान या विषयांचे अभ्यासक.

***पत्ता :—*** १२, सिंगबाल बिल्डिंग, टोक, करंझोले, गोवा-४०३००२.
दूरध्वनी :- (०८३२) २४६२९८१.

◈ **हरगोविंद म. होले.**

माजी प्राचार्य श्रीकृष्ण हायस्कूल व ज्युनियर कॉलेज आमला, जिल्हा अमरावती.

***पत्ता :—*** आमला, विश्वेश्वर चांदुर रेल्वेस्टेशन अमरावती. पि. ४४४ ९०४. भ्रमणध्वनी : ९५६१७२९३९९

◈ **प्राचार्य डॉ. पंडितराव शा. पवार**

मराठीचे निवृत्त प्राध्यापक. एम. ए., पीएच. डी. (मराठी); नाशिक जिल्हा मराठा विद्याप्रसारक समाज, नाशिक या संस्थेत ३० वर्षे प्राचार्य. पुणे विद्यापीठाचा उत्कृष्ट प्राचार्य म्हणून पुरस्कार. साहित्य व शिक्षण यांवर लेखन. गेली चाळीस वर्षे उच्चशिक्षण क्षेत्रात कार्यरत.

***पत्ता :—*** ६, ऋषिराज पार्क, अरिहंत नर्सिंग होमजवळ, गंगापूर रोड, नाशिक - ४२२०१३.
दूरध्वनी :- (०२५३) २३४३७८७. भ्रमणध्वनी : ९४२३१८१०८७.

◈ **श्री. विष्णू नारायण पावले.**

पहिलं पाऊल कविता संग्रह प्रसिद्ध. इंद्रजित भालेराव यांची कविता- आकलन, आस्वाद आणि आक्षेप (संपादक भगवान काळे), अन्वयार्थ : लक्ष्मीकांत देशमुख यांच्या साहित्याची समिक्षा, (संपादक- रणधीर शिंदे) या दोन्ही ग्रंथात लेखांचा समावेश, कथा ललित गद्य लेखन. साहित्य अकादमी भारत सरकारकडून प्रवासवृत्ती प्राप्त. दैनिक पुढारी कोल्हापुर येथे मुद्रित शोधक म्हणून कार्यरत.

***पत्ता :—*** मु. पावलेवाडी, पो. रिळे, ता. शिराळा, जि. सांगली - ४१५ ४०८. मो. ९८८१२४१८८७.

◈ **प्रा. डॉ. चंद्रशेखर बर्वे.**

स. प. महाविद्यालयात मराठीचे विभाग प्रमुख व प्राध्यापक (आता निवृत्त) 'तेंडुलकरांची नाटक' या विषयावर प्रबंध लेखन.

***पत्ता :—*** बी. ४/३, पी. डब्ल्यू. डी. सासायटी, रामबाग कॉलनी, नवी सदाशिव पेठ, पुणे - ४११ ०३०.

हे मासिक प्रा. यशवंत कळमकर यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.


अनुक्रमणिका

